# मराठी वाङ्मयाचा (गाळीव) इतिहास

## पुरुषोत्तम लक्ष्मण देशपांडे



# मराठी वाङ्मयाचा (गाळीव) इतिहास

पुरुषोत्तम लक्ष्मण देशपांडे





श्री० पु० ल० देशपांडे यांचा 'मराठी वाङ्मयाचा (गाळीव) इतिहास' हा लेख १९६७ सालच्या मौज दिवाळी अंकात प्रसिद्ध झाला. त्यात त्यांनी प्राचीन मराठी वाङ्मयाच्या इतिहासाचे आपल्या अजोड विडंबनशैलीत कथन केले होते. तसेच अर्वाचीन व मराठी वाङ्मयाचेही करावे असा त्यांचा बेत होता. त्यासाठी आवश्यक ती वाङ्मयेतिहासाची पुस्तकेही त्यांनी गोळा केली होती. १९६८च्या मौज दिवाळी अंकात हा दुसरा लेख प्रसिद्ध करावा आणि मग त्या दोन्ही लेखांचे मिळून एक पुस्तक करावे असा संकल्प होता. पण या ना त्या कारणाने त्यांना पुरेशी सवड झाली नाही, आणि त्यांचा बेत आजपर्यंत तसाच राहून गेला. त्यांच्या प्रकृतीचे अस्वास्थ्य ध्यानी घेता आता तो पुरा होणे कठीण दिसते. म्हणून 'मराठी वाङ्मयाचा (गाळीव) इतिहास' हा लेखच पुस्तकरूपाने प्रसिद्ध करायचे ठरवले.

'पु० ल० अमृतोत्सव अभीष्टचिंतन' समितीने आयोजित केलेल्या सोहळ्यात या पुस्तकाचे प्रकाशन होत आहे. असा औचित्यपूर्ण योग जुळून आला याचा आनंद वाटतो.

—श्री०पु०भा०

८.१.१९९४



# अनुक्रम



'गाळीव इतिहास'कार — आम्ही

एक भारदस्त व्यक्तिमत्त्व (खास या संशोधनासाठी)



# प्रस्तावना

साहित्यात बराचसा मान मजकुरापेक्षा मथळ्यामुळे मिळतो हे ध्यानात येई येईपर्यंत पन्नाशी आली. आमचे उथळ लिखाण आम्ही उथळ आहे हे सांगून दिले होते. त्याशिवाय लोक खळखळून हसत नाहीत हा अनुभव होता. उथळ पाण्याप्रमाणे उथळ लिहिण्यालाही खळखळाट फार. इतक्या इमानाने सांगूनही अखंड ज्ञानेश्वरी एखाद्या कसरीसारखी खाऊन काढणारे विद्वान, लिटर लिटर शांतरस बसल्या बैठकीला रिचवणारे महापंडित[१], आम्ही विद्वत्तेचा धंदा न करता हसवण्याचा धंदा करतो म्हणून विषय सोडून आमच्या विरुद्ध बरळू लागले. नशीब, विषयच सोडला. कारण त्यांचा संताप अनावर झाल्याचे कळले होते. हे सारे ऐकून आम्ही अंतर्मुख झालो. एकाएकी 'मी'पणा जाऊन 'आम्ही'पणा[२] आला. "खोली वाढवली पाहिजे", "खोली वाढवली पाहिजे" म्हणू लागलो. आमचे एक मित्र म्हणाले, "त्यापेक्षा ओनरशिपचा ब्लॉक घ्या." त्यांचा वाङ्मयाशी संबंध नाही. नुसतेच वाचक आहेत. त्यांना वाङ्मयीन खोली कशी असते ठाऊक नाही. शेवटी 'वाङ्मयाचा इतिहास' लिहिल्याखेरीज गत्यंतर नाही हे उमगले.

मुकुंदराजाचा विवेकसिंधु, परमामृत, पवनविजय, मूलस्तंभ वगैरे न वाचल्याचे हे परिणाम आहेत हे ध्यानी आले. पहिला सोडून बाकीचे तीन

---

१. म्हणूनच ह्यांना डॉक्टर ऑफ लिटरेचर म्हणतात का हो?

२. 'मी'पणा जाऊन 'आम्ही'पणा आला की मीपणा वाढतो हे व्यावहारिक सत्य असले तरी साहित्यिक असत्य आहे.

हे वैद्यकीय ग्रंथ आहेत अशी आमची समजूत होती. आणि पहिला ग्रंथ नसून आयुर्वेद रसशाळेने बनविलेले औषध आहे असे मानीत होतो. आम्ही मुकुंदराज वाचला नाही, लोलिंबराज ठाऊक नाही, चांगदेव-पासष्टी, ज्ञानेश्वरी (पसायदान तेवढे सभासंमेलनांत ऐकून होतो), लक्ष्म कवीचा 'रत्नकोश', मोगलिपुत्त तिष्य (हा ग्रंथ की ग्रंथकार हे अजूनही ठाऊक नाही. सॉरी !), भोजलिंगाचे 'महात्मसार', मन्मथस्वामीचे 'मन्मथ-बोधामृत', म्हाइंभट्टाचा 'पद्य खरडा' (हा आदेश नसून ग्रंथ आहे), असले ग्रंथ आपण वाचले नाहीत ह्याचे परमदुःख झाले. आणि अभ्यासासाठी म्हणून पूर्वसूरींचे आणि चालू सूरींचे ग्रंथ मागवले. चारचार-पाचपाच किलो वजनाचा तो एकेक ग्रंथ पाहून थक्क झालो आणि वाचू लागल्यावर एक जुने विनोदी व्यंगचित्र आठवले. (विनोदाशी हा शेवटला संबंध. यापुढे तलाक तलाक तलाक.)

### वेटलिफ्टरचा दृष्टान्त

एक वेटलिफ्टर लोखंडी दांडीच्या दोन्ही बाजूंना लावलेले मोठ्या फूटबॉलएवढे लोखंडी गोळे उचलून दाखवतो आणि ती गोळे लावलेली जड दांडी खाली ठेवतो. लोक त्या आधुनिक भीमाच्या सामर्थ्याने थक्क होतात. तेवढ्यात एक कुत्रे येते आणि दातांत दांडी धरून पळते. जे लोखंडी गोळे वाटले होते, ते लोखंडी रंगाचे रबरी फुगे होते. असो.

### धीर आला

आम्हांला धीर आला. आणि अनेक ग्रंथांचे परिशीलन केले. लायब्ररीतून घरी पुस्तके आणून ती बरेच दिवस ठेवून देण्याच्या क्रियेला परिशीलन म्हणतात हेही आम्हांस ठाऊक नव्हते. असो. कालांतराने शब्दांना आलेली सूज आणि बाळसे साहित्याच्या क्षेत्रात एकाच कौतुकाने पाहिली जातात हे कळले. पुन्हा धीर आला. अनेक ग्रंथांचा जाहीर थोरपणा आणि अंगभूत मेदवृद्धी पाहून थक्क झालो. त्यांतली चरबी वितळवल्यावर उरलेला मराठी वाङ्मयाचा गाळीव इतिहास पुढील पानांत आहे.

आता तरी विद्वानांच्या आत्म्यांस शांती मिळो ही प्रार्थना. हसवण्याच्या धंद्याला वेळीच जर 'हास्यरसपरिपोषात्मिका' म्हणायचे सुचले असते तर हा ताप वाचला असता. असो.

ग्रंथाच्या शेवटी संदर्भग्रंथांची यादी जोडणार होतो. परंतु ती पाने मूळ ग्रंथाच्या पानांहून अधिक भरू लागल्यामुळे जोडता येत नाहीत, तरी वाचकांनी क्षमा करावी. संदर्भग्रंथांची यादी नसली तरी तळटिपांवरून आम्ही विद्वत्तेचा किती तळ गाठला आहे हे कळेल.

## आभार

या ग्रंथलेखनात कु॰ चपला रांगणापूरकर, एम॰ ए॰ ह्या माझ्या विद्यार्थिनीचे साहाय्य झाले आहे हे नमूद केलेच पाहिजे. प्रस्तुत लेखकाच्या मार्गदर्शनाखाली 'यादवकालीन मराठीसंबंधी आजकालीन यादवी' हा प्रबंध त्यांनी पुरा करीत आणला आहे.[३]

*शालिवाहन शके १८८९* — ग्रंथकर्ता
*आश्विन वद्य एकादशी.*[४]

---

३. हल्ली हेही एक ठेवून द्यावं लागतं. बरं असतं म्हणे. एक साधं विद्वान व्हायचं म्हणजे काय काय ताप असतो पाहा!

४. तारीख घालण्याऐवजी तिथी[१] घालण्यामुळे ग्रंथाला भारदस्तपणा येतो हे सुचवल्याबद्दल डॉ॰ सौ॰ 'ळ', एम॰ ए॰ ह्यांचा मी ऋणी आहे.

---

१ डॉ॰ सौ॰ 'ळ'॰ एम॰ ए॰
आणि ग्रंथभार.





# मराठी भाषेची पूर्वपीठिका

**मराठी लोक मराठी का बोलतात?**

ज्याला आपण महाराष्ट्र म्हणतो त्या देशात ज्याला आपण मराठी म्हणतो ती भाषा बोलतात. आता मराठी बोलण्याचे मुख्य कारण इथल्या लोकांना एवढी एकच भाषा येते हे! मुसलमानांनी त्यांना उर्दू शिकविण्याचा प्रयत्न केला व तोबा तोबा म्हणत परत गेले. विशेषतः मिरज आणि सावंतवाडी येथील मुसलमानांचे उर्दू ऐकून औरंगझेबाने हाय खाल्ली आणि बऱ्हाणपुरी प्राण सोडला असे म्हणतात. पुढे हे मराठे दिल्लीवर चाल करून गेले आणि पेशव्यांचे वकील दरबारात आणि वकिलीणबाई करोलबागेत उर्दू बोलावयाला लागल्यावर 'हल्ला चालेल, पण उर्दू आवरा' अशा मागण्या आल्या. मर्द मराठ्यांनीसुद्धा शत्रूवर हल्ला चढविताना मराठी शिव्यांची शिवकालीन उर्दू-मराठी कोशातली उर्दू भाषांतरे जोरात उच्चारून यवनांस हैराण केले. तात्पर्य, मराठी लोकांना मराठीखेरीज इतर भाषा येत नसल्यामुळे मराठी लोकांची भाषा मराठी आहे. पुढे इंग्रजाने आपली भाषा शिकविण्याचा एक निकराचा प्रयत्न केला. दीडशे वर्षांच्या अव्याहत परिश्रमांनंतरदेखील ब्याट, ब्यांक, ब्याडमिंटन्, गूड ह्याबिट्स यांड ब्याड ह्याबिट्स वगैरे ऐकून, महाराष्ट्र मराठी लोकांवर सोपवून स्वतःचे इंग्रजी सुधारावयाला तो मायदेशी[१] परतला.

---

१. मायदेशातला 'माय' हा मराठी की इंग्रजी याबद्दल मात्र इथे अजून वाद चालू आहे. काही भाषाशास्त्रज्ञांच्या मते माय म्हणजे आई असेही आहे. उदा०, कुणाची माय व्याली? सर्वसाधारणतः हा शब्द माय म्हणजे माझा ह्याच अर्थी आहे हे उघड आहे.




**मर्द मराठ्याचा दरारा**

**हाती तळपती तलवार आणि मुखी धारधार उर्दू**

## मूळ भाषा

पुणे, मुंबई, नागपूर, अकोला, रत्नागिरी, संगमेश्वर, नाशिक, पिंपळगाव, तळेगाव ढमढेरे, नातेपोते वगैरे शहरे वसण्यापूर्वी महाराष्ट्रात जंगले होती. जंगलांत श्वापदे असावीत असा विद्वानांचा अंदाज आहे. त्यामुळे मूळ भाषा गर्जना, डरकाळ्या, कोल्हेकुई, कावकाव वगैरे असावी. त्याची लक्षणे आजच्या मराठीत, विशेषतः वृत्तपत्रीय मराठीत, फार आढळतात. जंगलांत श्वापदांपूर्वी माणसे होती की माणसांपूर्वी श्वापदे होती याचा निश्चित पुरावा मिळत नाही. मात्र नद्या व समुद्र ह्यांत मासे असल्यामुळे कोळी होते असे म्हणतात. भिल्लही होते. ते आता चांगले शिकलेसवरले म्हणून त्यांना आपण आदिवासी किंवा मागासलेल्या जमाती म्हणतो. "आपण महाराष्ट्र म्हणतों त्या देशांतले अतिप्राचीन व मूळचे रहिवासी राक्षस, यक्ष, कातकरी, भिल्ल, कोळी वगैरे लोक असावे," असे 'महाराष्ट्र सारस्वत'कारांचे म्हणणे आहे व पुराव्यादाखल त्यांनी तळ-

टिपेत राक्षसभुवन, राक्षसतागडी वगैरे शब्द प्रसिद्ध आहेत हे सांगितले आहे. आमच्या मते राक्षस हे अतिप्राचीन व मूळचेच काय पण आजचेही रहिवासी आहेत. (पाहा: राक्षसी महत्त्वाकांक्षा किंवा जमल्यास राक्षस-विवाह.[२]) महाराष्ट्र हे ज्या वेळी दाट जंगल होते त्या वेळी त्याला दंडकारण्य म्हणत. म्हणजे फारिष्ट खात्याचा कायदा तोडणाऱ्याला दंड करून सोडून देत. हल्ली वशिल्यावर सोडतात. संस्कृतीचा इतका विकास व्हायला बरीच वर्षे लागली. या अरण्यात काही बायका शिला होऊन पडल्या होत्या. ऋषी बायकांवर भडकले की त्यांना शिला करीत. दंड-कारण्यातल्या मराठी ऋषींचे हे वैशिष्ट्य होते. रामाचा पाय लागल्यावर एक शिला पुन्हा बाईच्या बाई होऊन उभी राहिली. सर्वच शिलांना रामाचा वशिला मिळाला नाही, त्यामुळे त्या शिलाच राहिल्या. कदाचित पुन्हा कुणाचा तरी वशिला लावून बाईही झाल्या असतील आणि आपल्या लक्षात फरक येत नसेल. पण दंडकारण्यात राम येण्यापूर्वी नाग लोक आले. त्यांच्यामुळे साहजिकच नागा प्रॉब्लेम तयार झाला. "नागोठणें, नागपूर, नागांव हीं नागांचीं नांवें असलेलीं गांवें अजूनहि आहेत." (पाहा: 'महाराष्ट्र सारस्वत', लेखक कै० वि० ल० भावे आणि पुरवणीलेखक डॉ० शं० गो० तुळपुळे.) नागांचा प्रभाव मराठीत अजूनही आहे असे आम्हांस वाटते. (पाहा: नागोठणे याप्रमाणेच ना० गो० कालेलकर, ना० ग० गोरे, ना० ग० जोशी इ० इ०.) आता ही आर्य, नाग वगैरे मंडळी 'मराठी' का बोलू लागली यावर विद्वानांचे दुमत[३] आहे.

## मराठीची खमंग निर्मिती

थोडक्यात म्हणजे शौरसेनी, प्राकृत, पाली, कानडी, पंजाबी, जपानी, मागधी, पैशाची वगैरे भाषांच्या मिसळीतून मराठीची खमंग निर्मिती झाली. आज शौरसेनी, मागधी वगैरे जरी कोणी बोलत नसले तरी पैशाची भाषा मात्र सगळे बोलतात. वरवर मात्र आपल्याला पैशाची भाषा कळत नाही हा विनय दाखवीत, प्रकाशकाला किती पैसे द्याल हे विचारून पानागणिक हिशेब असला तर त्याप्रमाणे ग्रंथाचे माप धरतात.

आता या शौरसेनी, मागधी, प्राकृत, महाराष्ट्री अपभ्रंश म्हणजे

---

२. हाही पाहा. 'करा' नव्हे!

३. अज्ञानाला विद्वानांच्या जगात दुमत म्हणतात.

मराठीखेरीज जवळ जवळ सर्वच भाषांतून तयार झालेल्या मिश्रणाला 'मराठी' हे नाव का आले ह्याबद्दल विद्वानांत तीव्र[४] मतभेद आहेत. म्हणजे 'मराठी' हा पदार्थ तयार कसा झाला ह्याची रेसिपी मिळत नाही हा अर्थ.

### ठोकळमान

"आतां ठोकळमानानें असें म्हणतां येईल कीं शकपूर्व ३१०० पासून ते शकपूर्व १००० वर्षेपर्यंत नाग लोक येथें होते." असे महाराष्ट्र सारस्वतकार म्हणतात. महाराष्ट्र सारस्वतकार भावे व पुरवणीकार डॉ० तुळपुळे यांच्याशी आम्ही सहमत आहो. काही लोक उगीचच शकपूर्व ३१०१ ते शकपूर्व १००२ पर्यंत नाग लोक येथे होते म्हणतात. शकपूर्व १००० नंतर महाराष्ट्रात राहिलेला एक नाग काढून दाखवावा असे आमचे आव्हान[५] आहे. तात्पर्य, नागांच्या बाबतीत वर दिलेले ठोकळमानच अचूक आहे. आता मुख्य प्रश्न, नाग लोकांच्या देशाला 'महाराष्ट्र' हे नाव का व कोणी दिले? गुजराती लोकांच्या प्रांताला गुजरात, बंगाल्यांच्याला बंगाल वगैरे नावे देणाऱ्या माणसाचेच हे काम नसावे. कारण ती नावे सरळ आहेत. नाग, श्वापदे, राक्षस, यक्ष, भिल्ल वगैरे जिथे राहतात अशा प्रांताला महाराष्ट्र हे नाव द्यावयाचे हे रत्नागिरी जिल्ह्यातल्या माणसाचे काम असावे. भाषेचे इतके तिरके वळण तिथेच. कारण तिथे कंपाउंडरला सिव्हिल सर्जन म्हणतात आणि बेलिफाला न्यायमूर्ती! काहींच्या मते महारांचे राष्ट्र म्हणून महाराष्ट्र. ही व्युत्पत्ती 'बालिश' आहे असे महाराष्ट्र सारस्वतकारांचे मत असल्यामुळे आम्ही गप्प बसतो. त्यांच्या विरुद्ध जाणे आम्हांला बरे वाटत नाही. मराठी साहित्याचे बरेचसे इतिहास ह्या त्यांच्या इतिहासाला नावे ठेवीत, परंतु त्यांच्याच इतिहासात विद्वत्तेचा पेंढा भरून फुगवून स्वतःचे म्हणून छापलेले आहेत. आम्ही अजून तितके विद्वान नसल्यामुळे प्रामाणिक आहो. (एवढा हा इतिहास कुठे तरी लावा, मग बघू.)

महाराष्ट्राचे मूळ नाव 'मरहट्ट' असून तिथे हट्टी किंवा हाट लोकांची

---

४. कंपोझिटर, 'तीव्र' शब्द जुळवताना तो तुमचा जबरा की काय टाईप असतो तो गायतो काय बघा. थँक्यू!

५. नागपंचमीला पाटावर पिठाचे नाग काढतात ते धरले जाणार नाहीत.

वस्ती होती, असे कर्नाटकातील सुप्रसिद्ध संशोधक शं० बा० जोशी यांचे मत आहे. मरेपर्यंत बेळगाव-कारवारचा हट्ट धरून बसलेले ते 'मरहट्टे' हे आम्हांसही मान्य आहे. पण काही ठिकाणी 'मरहट्ट' असे नसून 'महारट्ट' असेही उल्लेख सापडतात. तेव्हा इथे कोणी तरी कुणाला तरी 'रट्टे' दिलेले दिसतात. ही मराठ्यांची[६] सवय. त्याच्या तपशिलात न जाणे बरे. महामहोपाध्याय काणे यांचे मत, 'महान लोकांचे राष्ट्र' ते महाराष्ट्र. पण हे नाव पडण्याच्या काळात राक्षस, यक्ष वगैरे लोक असल्यामुळे 'महान' हीदेखील हल्लीच्या 'थोर'सारखी जात असावी. साधे पुढारी आणि थोर पुढारी, कलावंत आणि थोर कलावंत, साहित्यिक आणि '...म्हणजे थोरच' वगैरे जातींप्रमाणे महान ही जात असावी. थोर हीही असावी. महान लोक हत्तीवरून जात, म्हणून महान झाले व थोरांचे थोरात झाले. महाराष्ट्राला नाव कसे पडले यापेक्षा महाराष्ट्राला हल्ली जो तो नाव का ठेवतो याचा विचार करणे अधिक अगत्याचे आहे असे आम्हांस वाटते. त्यामुळे काही लोकांनी मरहट्ट मानावे, काहींनी महरट्ठ. ज्यांना महान लोकांचे राष्ट्र



**नवव्या किंवा चौथ्या अगर तिसऱ्या शतकातील शिलालेख.**
**शेजारी मोडलेली लेखणी. दगडीच.**

**(अर्थ लागत नाहीच. पण वाचताही येत नाही. या दुहेरी अडचणीने वैतागून एका वाचकाने चिडून ज्या दगडाने लेखणीचे एक घाव दोन तुकडे केले तो दगड शेजारी.)**

---

६. कंपोझिटर, 'ठ्या'वरचा अनुस्वार उच्चारित आहे. गाळू नका. नाहीतर आमची मौत. थँक्यू!

मानावयाचे असेल त्यांनी तसे मानावे. प्रत्येकाला आपापल्या मताच्या पुष्ट्यर्थ भरपूर शिलालेख सापडतील. जोपर्यंत ते धड कुणालाही वाचता येत नाहीत तोपर्यंत प्रत्येकाने दोनचार दगड हाताशी बाळगून ठेवावे. डोक्यात शिरले नाहीत तर घालता येतील.

तर मराठी भाषेची पूर्वपीठिका ही अशी आहे. इतक्या उप्पर विशेष पुरावा हवा असल्यास नवव्या किंवा चौथ्या अगर तिसऱ्या शतकातील हा शिलालेख पाहावा :

कापासीदामासूंबाल्याचावुंडाये।
किडर्मेअस्सऊन लह्ह। वुकें लींहतें।

वरील शिलालेख वाचल्यावर त्याचा अर्थ लागत नाही हे सहज ध्यानात येईल. अर्थ न ध्यानात येण्यासारखे लिहिण्याची मराठी प्रवृत्ती प्राचीन आहे, एवढे ध्यानात यावे म्हणून शिलालेख उद्धृत केला आहे.





# ग्रंथकर्तृत्वाची सुरवात

## मुकुंदराज

गेल्या प्रकरणात आपण महाराष्ट्र आणि मराठी हे शब्द कसे आले ते पाहण्याचा प्रयत्न करून तो नाद सोडला. आता माणसे निमूटपणे बोलावयाचे सोडून लिहावयाला कशी लागली आणि त्यांच्यामागे असा कुठल्या संपादकाचा अगर प्रकाशकाचा तगादा लागला होता हे पाहावयाचे आहे.[१]

मुकुंदराजाचा 'विवेकसिंधु' हा पहिला मराठी ग्रंथ म्हणतात. पण ते चूक[२] आहे. आता मुकुंदराज हा आद्य लेखक कसा? शक्यच नाही. उद्या वाटेल तो स्वतःला आद्य म्हणेल. शिवाय हाताशी पाचपन्नास ग्रंथ असल्याशिवाय एवढा मोठा ग्रंथ होणे शक्य नाही. महाराष्ट्रात आधी खूप ग्रंथरचना होती. किंबहुना, आधी सगळे कोश, संदर्भग्रंथ वगैरे तयार करूनच दंडकारण्यातल्या राक्षस, यक्ष वगैरे लोकांना मराठी शिकविले. काही दिवस मराठी ही त्यांची सेकंड लँग्वेज होती. राक्षसी, यक्षी वगैरे

---

१. लेखकाला मोबदला काय मिळत होता ह्याविषयी कुठेही शिलालेख अगर भूर्जपत्र वगैरेचा काडीमात्र पुरावा नाही. कुठल्याशा शाहिराला दरबारात काव्यगायन केल्याबद्दल म्हणे शिवाजीमहाराजांनी सोन्याचा तोडा दिला होता. काव्यगायनवाले पहिल्यापासून वस्ताद. पैशाशिवाय तोंड नाय उघडायचे.

२. बरोबर आहे म्हटले की प्रकरण अर्ध्या पानात खलास. पैसे पानावर ठरले आहेत. प्रिय कंपोझिटर, हे वाक्य जुळवताना शब्दांची आलटापालट करावी, म्हणजे अर्थ फक्त आमच्या आतवाल्यांक तितको कळतलो – समजलां मां? थ्यांक्यु.

भाषा चालू होत्या. त्यांना प्राथमिक शिक्षण मातृभाषेतच देत. राक्षसी भाषेच्या पहिलीच्या पुस्तकात धडा होता :

काका उठा

जबडा उघडा

हा रामा आला

त्याचा फडशा पाडा.

फडशा, जबडा, टांग, नरडे, गटागटा, हे शब्द मराठीत राक्षसी भाषेतूनच आले. त्याशिवाय मग पैशाची भाषा सुरू झाल्यावर मोबदला, मानधन, अनुदान, पारितोषिके, परीक्षक, प्रश्नपत्रिका वगैरे शब्दांची भर पडली.



राक्षसी भाषेतील पहिला धडा

त्या त्या अनुषंगाने संतापनिदर्शक शब्दांचीही भर पडली. वशिला, वजन, सरकारदरबार, गटबाजी, इ० इ०.

### सगळीकडे मराठीच मराठी

एकदा सगळे कोश तयार झाल्यावर मग सगळीकडे मराठीच मराठी झाले. आणि एकदा इतके मराठी शब्द साचल्यावर ते मोकळे करणे प्राप्तच होते, म्हणून ग्रंथरचनेला सुरुवात झाली. काही दिवस सगळेच ग्रंथरचना

करण्यात गढल्यामुळे घोटाळे होऊ लागले. म्हणून मग प्रत्येकाला निर-निराळी कामे नेमून दिली. ब्राह्मण, सोनार, न्हावी, कासार, लोहार, साळी, कोष्टी, शिंपी, सुतार वगैरे एकदा मराठीत तयार केले आणि मग त्यांना त्यांच्या त्यांच्या कामाला जुंपले. पूर्वी शिंप्याकडे बाराबंदी शिवावयाला कुणी टाकत नसे. कारण 'बाराबंदी' हा शब्द मराठीत नव्हता. एकदा वस्त्रकोश तयार झाल्याबरोबर शिंपी भराभर शिवू लागले.[३] ब्राह्मण वगळले तर बाकीच्यांच्या मराठीची उत्तम सोय झाली. पण ब्राह्मण मात्र संस्कृतचे पंडित. त्यामुळे त्यांची मराठी संस्कृतभ्रष्ट किंवा धेडगुजरी-सारखी 'धेडगीर्वाणी' असायची. इतरांचे प्यूअर मराठी असल्यामुळे त्यांच्यातले व्यवहार व्यवस्थित झाले. ब्राह्मणांचे वांधे आले. त्यांचे ते अधूनमधून मराठी घातलेले संस्कृत कुणाला बोललेले कळेना. एलिच-पूरच्या एका पोथीत एक ब्राह्मण-नापित संवाद आहे:

**ब्राह्मण**: नापिता, क्षौर करावें एवं ईप्सा. (अपभ्रष्ट मराठी.)

**नापित**: काय म्हनूतोस रे बामना? तिच्यामारी.[४]

**ब्राह्मण**: (अभिनयें वर्तवीत) क्षौर रे नापिता.

**नापित**: हात्त्याच्या! डुई करायची म्हना की भटजीबावा! च्या** सरळ बोलायला काय हुतं रे*ड**...(पुढचे शब्द आपल्याला लागत नाहीत; पण ब्राह्मणाला लागल्याशिवाय राहिले नसतील.)




**ब्राह्मणांचे वांधे**

---

३. हल्ली मराठी कोश नसल्यामुळे प्रगती साफ खुंटली आहे. एकदाचा तो विश्वकोश झाला की आपण नवे विश्व उभारू शकू.

४. हे यादवकालीन शुद्ध मराठी आहे.

वरील उदाहरणावरून स्पष्ट होईल की मराठीच्या अज्ञानामुळे ब्राह्मण लोकांना गावगाड्यातल्या इतरांशी व्यवहार अवघड झाला. गावात गप्पा माराव्या म्हटले तर तीच तीच भटजी मंडळी. एका भूर्जपत्रावर पाचव्या शतकातल्या धोंडुभट्ट नामक ब्राह्मणाने स्पष्ट लिहिले आहे: "कस्मद्संगें वार्तालापावें इति अस्मद्..." पुढील अक्षरे अस्पष्ट झाली आहेत. तात्पर्य, बोलावयाला कोणी नाही, म्हणून ब्राह्मणांनी लिहावयाला सुरुवात केली आणि ह्यातून संस्कृतअपभ्रष्ट ग्रांथिक मराठी आणि चारचौघांची शुद्ध मराठी असे भेद पडले. इतर नुसते बोलत, त्यामुळे त्यांना वाचावयाची गरज नव्हती. हे लिहीत, त्यामुळे वाचावयाला शिकले. परिणामी लेखन-वाचन हे ब्राह्मणांकडे राहून इतर सर्व महत्त्वाची कामे इतरांकडे गेली. इतर शेती पिकवीत असताना ब्राह्मण शब्द पिकवीत होते. ते गवताचे भारे रचीत, हे कवितांचे भारे रचीत होते. त्यांतील बहुतेक ग्रंथ लिहिल्याचेच पुरावे आहेत, वाचल्याचे नाहीत. पण साहित्याच्या इतिहासात त्यांची नावे घेतल्याखेरीज गत्यंतर नाही. नामस्मरणाचे आपल्या संस्कृतीत फार माहात्म्य आहे.

## विवेकसिंधु

मुकुंदराजांचा विवेकसिंधु हा ग्रंथ काहीसा विवेकासंबंधी आहे आणि थोडासा सिंधूसंबंधी आहे. मुकुंदराजांना संस्कृत कळत असले तरी त्याच्या शारंगधर नावाच्या राजाची सेकंड लॅंग्वेज पाली किंवा अर्धमागधी असल्यामुळे ग्रंथ मराठीत लिहिला. नाहीतर शारंगधर राजाच्या समाज-कल्याण खात्याने तो बक्षीसपात्र ठरवला नसता. अर्थात मुकुंदराजाला त्याची पर्वा नव्हती. तसा तो विवेकी असल्यामुळे जयंतपाळ नावाच्या व्यापाऱ्याकडून त्याने आधीच रिसर्च-ग्रांट मिळवली होती. मुकुंदराजाने स्वच्छ लिहिले आहे, जयंतपाळने पाळलेला मी लेखक आहे: "नृसिंहाचा बल्लाळू। तेयाचा कुमरू जयंतपाळू। तेणें करविला हो रोळू। ग्रंथरच-नेचा॥" त्या काळातले लेखक आपल्याला ग्रंथ लिहावयाला कोणी पैसे दिले हे स्पष्ट सांगत असत. हल्ली आपल्याला कोण पाळतो ते सांगत नाहीत. तेही एक बरेच. तात्पर्य काय, आश्रय हवा. मुकुंदराजाची एक समाधी जोगाईच्या आंब्यास दाखवितात आणि आणखी एक समाधी नागपूर प्रांतात बैतूलजवळ खेडले ह्या गावी दाखवितात. आपण दोन्हीही पाहाव्या. (दुसऱ्याच्या खर्चाने जमल्यास उत्तम.) त्यानंतर (म्हणजे विवेक-

सिंधु लिहिल्यानंतर; दोन समाध्या घेतल्यानंतर नव्हे.) मुकुंदराजाने परमामृत, पवनविजय आणि मूलस्तंभ हे ग्रंथ लिहिले, असे काही विद्वानांचे मत आहे, आणि हे ग्रंथ त्याने लिहिले नाहीत असे इतर काही विद्वानांचे मत[५] आहे.

## हेमाडपंत

मुकुंदराजानंतर हेमाडपंत नावाचा ग्रंथकार झाला. ह्या गृहस्थाला ग्रंथ लिहावयाला वेळ केव्हा मिळत असे कळत नाही. देवगिरीच्या शासकीय राजस्व मंत्रणालयात तो नोकरीला होता व चढत चढत 'श्रीकरणाधिप' म्हणजे राजस्वप्रसचिव किंवा सर्वसाधारण लोक ज्याला चीफ रेव्हेन्यू सेक्रेटरी म्हणतात त्या हुद्यावर होता. ह्या गृहस्थाने मोडी शोधून काढून महाराष्ट्रातल्या अनेक पिढ्यांतल्या पोरांच्या आणि इतिहाससंशोधकांच्या शिव्या खाल्ल्या आहेत. एकदा मोडी गिरवावयाचे खर्डे काढकाढून पाठीच्या कण्याला आणि मांडीला रग लागल्यामुळे वैतागून परतणाऱ्या शाळेतल्या पोरांनी सचिवालयावर मोर्चा नेला आणि ''मोडी मोडो, मोडी मोडो'', ''हेमाडपंत खर्डाबाद, हेमाडपंत खर्डाबाद'' अशा घोषणा दिल्या. हेमाडपंताला उपरती झाली. काम सुचेना. समोर फायलींवर फायली साचू लागल्या. त्यावरून त्याला कल्पना सुचली आणि दगडावर दगड रचून तो देवळे बांधीत सुटला. त्यांना हेमाडपंती देवळे म्हणतात. मोडी लिपीला 'पिशाच्च लिपी' म्हणत असत ते उगीच नाही. लिहावयास सोपे व वाचावयास अत्यंत तापदायक असे हे मोडी लेखन शाळाखात्याने बंद केले. स्वातंत्र्यानंतर सुखाची एवढीच एक झुळूक अंगावरून गेली. आता फक्त लिहावयाला सोपे आणि वाचावयाला मोडीसारखाच वैताग आणणारे म्हणजे वैताग-काव्य आणि सौंदर्यशास्त्रावरचे लेख. मोडी ही आधुनिक दुर्बोधतेची सख्खी आई नसली तरी खापरपणजी खास आहे.

त्या वेळी महाराष्ट्राची राजधानी देवगिरी ही होती. देवगिरीला कागदांचे व शाईचे कारखाने होते. काळ्या शाईला मषी म्हणत. ह्या

---

५. परीक्षेच्या पेपरात ह्यांपैकी कुठलेही मत लिहिले तरी तपासणारे विद्वान ज्या मताचे निघतील त्यावर काय ते मार्क पडणार. म्हणून उत्तराच्या सुरवातीला मुकुंदराजाने हे ग्रंथ लिहिले आहेत असे लिहावे आणि शेवटल्या परिच्छेदात लिहिले नाहीत असे लिहावे.

६. पूर्वी म्हशीचासुद्धा अपभ्रंश करीत. हल्ली फक्त दिलीप चित्रे इंग्लिश वाङ्मयाचा करतात.

म्हशीचा अपभ्रंश[६] आहे. कागद व शाई स्वस्त असल्यामुळे तेथे घरोघरी ग्रंथलेखन होऊ लागले. साहित्यिकांना अनुदाने देता देता रामदेवराव यादव टेकीला आला व लवकरच राज्य बुडाले. तलवारी टाकून लेखण्या धरल्या की असे होते. "रामदेवरावाची राज्यसभा मराठी ग्रंथकारांनी गजबजलेली असे," असे महाराष्ट्र सारस्वतकार भावे यांनी लिहिले आहे. चालू राज्यकर्त्यांनी या परिस्थितीची दखल घेऊन, साहित्यिकांची बक्षिसे बंद केली आहेत, ती रूढी चालू ठेवावी. रामदेवराव यांनी साहित्यिकांचे जे फाजील लाड केले त्यामुळे साहित्यिक चढले आणि देवगिरी पडली रामदेवराव मेले आणि अनेक पंत चढले. मेलेल्याला मारण्यात काही अ नाही म्हणून हे प्रकरण आम्ही इथेच मिटवीत आहो.





# श्रीचक्रधर आणि महानुभाव पंथ

महानुभाव पंथाचा मुख्य फायदा मराठीच्या प्राध्यापकांना झाला. ह्या पंथाची स्थापना करणारे श्रीचक्रधरस्वामी त्रिकालज्ञ होते. त्यामुळे मराठी ऑनर्सची त्यांनी आठशे वर्षांपूर्वीच सोय करून ठेवली. महानुभावांच्या वाङ्मयामुळे बी० ए०, एम० ए० व पीएच० डी० येथपर्यंतचा अभ्यास-क्रम होऊ शकला. मराठी भाषेत सर्वांत सुंदर गद्य वाङ्मय लिहायला मदत करणारे चक्रधरस्वामी ऊर्फ हरपाळ हे मूळचे गुजराती. चक्रधर त्रिकालज्ञ असले तरी मराठी लोक द्वैभाषिकाला विरोध करतील ही त्यांना कल्पना नव्हती. नाहीतर महदंबेला 'धवळे' लिहिण्याऐवजी 'खमण ढोकळे' करावयाला उत्तेजन दिले असते. मात्र चक्रधर गुजराती असूनही संयुक्त महाराष्ट्राला त्यांचा फुल सपोर्ट होता असे दिसते. त्यांनी एका ठिकाणी स्पष्ट म्हटले आहे: "कानडे देशा तेलंग देशा न वचावें। महाराष्ट्रीं असावें।" त्यामुळे कानडी, तेलगू वगैरे लोक इथे आले तरी आपले लोक तिकडे गेले नाहीत. महानुभाव पंथाच्या लोकांना निरनिराळ्या लिप्या येत असत. त्यामुळे ग्रंथ लिहावयाला लिपीची अडचण पडत नसे. ह्या पंथात कृष्णाची भक्ती करतात.

### डेअरिंगबाज कृष्ण

कृष्णासंबंधीची बरीच आतल्या गोटातली माहिती त्यांना असे. कृष्ण-रुक्मिणीच्या महालातल्या संवादाचा उतारा पाहण्यासारखा[1] आहे. कृष्ण इथे रुक्मिणीच्या तोंडावर म्हणताहेत की चांगली उर्वशी सांगून आली

---

१. पडताळून नव्हे, नुसताच.

होती आम्हांला आणि हे खुळे माकड गळ्यात बांधून घेतले.[२] रुक्मिणी-बाय पण कमी नव्हती. तिने आपल्या नवऱ्याचा जुना पोलिस-रिपोर्ट काढून 'तोंड बघा उर्वशी सांगून येणाऱ्याचं' ह्या चालीवर कृष्णरावांची हजेरी घेतली. गौळणींच्या भानगडींमुळे पोरी सांगून येईनात म्हणून गुरे राखण्यापलीकडे शिक्षण नसलेल्या इकडल्यांना शेवटी तुळशीच्या रोप-ट्याशी लगीन करावे लागले — वगैरे वगैरे. महानुभाव भिक्षेच्या निमि-त्ताने हिंडत फार. त्यामुळे त्यांच्या वाङ्मयाला वास्तवाचे अधिष्ठान आहे. कृष्णाने स्वतःला 'कासोटेकार भिकारी' म्हटले आहे. म्हणजे त्या काळात-सुद्धा तेलंगणातून लुंगीवाले बिनकासोट्याचे उपरे भिकारी येत होते तर! तरीच भिक्षा मागायला 'तेलंग देशी न वचावे'. तिथे कोण भीक घालतोय?

### पूजाअवसर

भावेदेवव्यासकृत 'पूजाअवसर' हे पूजेचे गाइड भावे, देव आणि व्यास ह्या तिघांनी लिहिले असावे. ती परंपरा महाराष्ट्रदेशी अजूनही चालू आहे. गाइडमधील चुका एकमेकांवर ढकलण्यासाठी ह्या पद्धतीचा उपयोग चांगला होतो.

### लीळाचरित्र

महानुभावांचा सगळ्यांत मोठा ग्रंथ म्हणजे लीळाचरित्र. त्यात लीळा आहेत. काही विद्वानांच्या मते लीला आहेत. आमच्या मते काही लीळा आहेत, काही लीला आहेत आणि काही चरित्र आहे. हल्ली महानुभाव वाङ्मय वाचून पूर्वीसारखे कुणी महानुभाव होत नाही. फक्त मराठीचे प्राध्यापक होतात. काही पीएच० डी० होतात. काही त्यांचे गाइड होतात. काही एक्स्टर्नल रेफरी होतात. ज्यांचा जो चक्रधरस्वामी असेल तसे त्याला फलित मिळते, असे कुठल्याशा स्वामीयेच कुठेशी भणितले आहे. पीएच० डी० घडवण्यासाठी होणाऱ्या विद्यापीठातल्या लीळांच्या मानाने ह्या लीळाचरित्रातील लीळा सपक आहेत.

### ही बोरी कुठली?

महानुभाव पंथातल्या लोकांना लिहिण्याची हौस दांडगी होती. भास्कर-

---

२. 'स्वतःच्या वाइफसमोर असं बोलायची शामत असलेला कृष्ण मलताच डेअरिंगबाज होता,' हे आमच्या गँगचे मत. लहानपणी त्याची डेअरी असल्यामुळे त्याच्यात डेअरिंग आले होते असे आम्हांला वाटते.

भट्ट बोरीकर हा त्यांच्यातला भारीपैकी कवी. ह्या बोरीचा. ही बोरी म्हणजे वऱ्हाडातली बुटी-बोरी की गोमंतकातल्या बोरी-शिरोड्यातली बोरी ह्याविषयी वाद आहे. डॉ० कोलत्यांच्या हाताखाली पीएच० डी० केल्यास वऱ्हाडातली हे सिद्ध होईल आणि अ० का० प्रियोळकरांच्या हाताखाली केल्यास गोमंतकातली असेही सिद्ध होईल. एके ठिकाणी "कवीश्वर कोकणा गेले" असा उल्लेख आहे. आणि "भटो श्रृंगारिया कवी की गा" असे नागदेवाने त्यांच्याविषयी म्हटले आहे. त्यावरून ह्या बोरीकाराची मूळ वसणूक गोव्याची असे वाटते. पण बोलण्यात थोडा नागपुरी उखडेलपणा आहे. कुठल्याशा काव्यगायनाच्या कार्यक्रमाच्या वेळी सेक्रेटरीने नुसते नाव अनाउन्स करायला "तुम्ही कवण?" असा प्रश्न केल्याबरोबर ह्या भास्करकवीने —

> केचित्खंडनगंडदंडितजगद्वीराधिपाः संस्फुरत्
> तर्काखर्गकुगर्वपर्वतसमारूढाविमूढामृशं।
> काव्यालापकलापकेलिकुशला श्रृंगारवीरावृता
> केचित् कृष्णकथासुसुंदरमतिस्तद् भास्करोऽहं कविः॥

असा श्लोकच्या श्लोक त्या सेक्रेटरीच्या तोंडावर फेकला. सेक्रेटरी तिथल्या तिथे खतम. स्टेजवर चारपाच डॉक्टर होते. पण ते महानुभाव वाङ्मयावर थिसिस लिहून झालेले डॉक्टर असल्यामुळे मांडवाबाहेर सेक्रेटरीचा मृतदेह काढावा लागला. नुसत्या शब्दांनी कुणाचाही बोऱ्या वाजविणारा हा कवी. तसले कवी आता राहिले आहेत कुठे?



नुसत्या शब्दांनी कुणाचाही बोऱ्या वाजवणारा कवी

महानुभावपंथाचा प्रसार वऱ्हाडात बराच झाला. पुण्याच्या बाजूला नाही. "महानुभाव पुण्यासि न वचे। तेथ प्रत्येकू भलताचि भाव खावोनी वसे। म्हणउनी भियेती।" अशी एका पोथीत तक्रार आहे. ती पोथी पानशेतच्या पुरात वाहून गेल्यामुळे आता उपलब्ध नाही. तर असे हे महानुभाव.





# ज्ञानेश्वर व इतर

ज्ञानेश्वरांनी सोळाव्या वर्षी ज्ञानेश्वरी लिहिली. त्या वेळी ग्रंथाचे नाव 'भावार्थदीपिका' असे ठेविले होते. नंतर कोणीतरी ते नाव बदलले. बहुधा स्वस्त पुस्तक योजनेच्या एखाद्या प्राचीन पुरस्कर्त्याने बदलले असावे. *आपली मराठी भाषा अमृतातेंहि पैजा जिंके असे ज्ञानेश्वरांनी म्हटल्यामुळे* प्रत्येकाला मराठी बोलताना आपण कसल्यातरी पैजा जिंकून राहिलो आहोत असे वाटते. ज्ञानेश्वर, रामदास, तुकाराम वगैरे संतमंडळीचे महाराष्ट्रावर फार मोठे उपकार आहेत. त्यांनी लिहिले नसते आणि संत व्हावयाचे सोडून भलत्या नादाला लागले असते तर 'ओल्ड मराठी'च्या पेपरांचे वांधे झाले असते. व्याकरण शिकविणाऱ्यांना उपमा, दृष्टांत वगैरेला उदाहरणे मिळाली नसती आणि पंढरपूरच्या वारकऱ्यांना शेकडो मैलांची वाट तुडवावयाला पुरतील एवढी भजने मिळाली नसती. शिवाय महाराष्ट्र 'संत तुकाराम', 'संत ज्ञानेश्वर' वगैरे चित्रपटांना मुकला असता. आणि प्रभात फिल्म कंपनीच्या साऱ्या आख्यायिका 'माणूस' आणि 'कुंकू' ह्या दोन चित्रपटांभोवतीच आणखी घुमत बसल्या असत्या. शिवाय कीर्तनकार लोकांची पंचाईत झाली असती ती वेगळीच. आणि मुख्य म्हणजे मुंबई 'ब'वर 'भजनामृत' कार्यक्रमात भावगीतवाल्या कवींकडून अभंग बनवून घ्यावे लागले असते.

### ज्ञानेश्वर कुटुंब

ज्ञानेश्वरांचे वडील विठ्ठलपंत. गावातल्या ब्राह्मणांचे आणि त्यांचे वितुष्ट आले होते. तत्कालीन बहुतेक ब्राह्मणांचा उद्योग सज्जन लोकांचा छळ करणे हाच असावा. फक्त रामदासांच्या वाटेला कुणी ब्राह्मण गेला

नाही. त्यांच्या कुबडीत गुप्ती लपवलेली होती ही गोष्ट ब्राह्मणांना ठाऊक असावी. शिवाय समर्थांचे आखाडे होते. ज्ञानेश्वर, तुकाराम वगैरे लोकांचे व्यायामाकडे फार दुर्लक्ष. त्यामुळे तुस्त ब्राह्मणांचे फावले. हे यात्रेच्या निमित्ताने चालत तेवढेच. पण नुसत्या चालण्याच्या व्यायामाने काय होणार? जरा जोर, बैठका वगैरे हव्यात. गावकऱ्यांनी विठ्ठलपंतांना छळले, आणि त्यांना आत्महत्या करावी लागली. निवृत्ती, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताबाई ही भावंडे उपाशी पडू लागली. गावकरी त्रास देऊ लागले. त्यांना भिंत चालवून दाखवली तरी खूष होईनात. शेवटी रेड्याच्या तोंडून वेद वदवले तेव्हा कुठे ब्राह्मणांची खात्री पटली. नंतर त्यांनी त्याला ज्ञानेश्वरी लिहू दिली. तिची नक्कल उतरताना चुका झाल्या. त्यामुळे माडगावकर प्रत, राजवाडे प्रत, अशा प्रती झाल्या. पण संशोधकांची चांगली सोय झाली. वाद मिटले की विद्वानांना काय काम? त्यामुळे वाद वाढत वाढत, ज्ञानेश्वरच मुळात एक की दोन इथपर्यंत मजल आली. क्वचित दुष्काळी कामांत रस्त्यांच्या बाजूची माती उकरून काढतात तसे वाद उकरूनही काढण्यात येतात. मग, जे खळांची 'व्यंकटी सांडो' की 'वांकुडे मोडे' ह्याच्यावर घटकेपूर्वी शांतरसात न्हालेले विद्वान 'बीभत्सातेंही लाजु वाटे' असे घाईला येतात. आणि एकूण साहित्यक्षेत्री चैतन्याचे पलिते पेटतात. ह्या साऱ्या सोयी करणारे आद्य संत म्हणजे ज्ञानेश्वर. हल्लीच ज्ञानेश्वराची उशी सावरीच्या कापसाची होती की तो निजेला धोंडा घेत असे यावरचा वाद उकरून विद्वानांनी एकमेकांची झोप उडविण्याचे कार्य चालविले आहे. काहींच्या मते निजेला एवढासा धोंडा कसा चालेल? धोंडच पाहिजे.

## ज्ञानेश्वरी : एक नुसतेच पॉप्युलर पुस्तक

लोकांना गीता सोप्या शब्दांत सांगावी म्हणून त्यांनी सोळाव्या वर्षी ज्ञानेश्वरी लिहिली. कुमारवाङ्मयाला त्या काळात उत्तेजन नसल्यामुळे लेखकाचे कौतुक झाले नाही. परंतु लोक खूष. ज्ञानेश्वरी आज गेली अनेक शतके खपते आहे. हजारो लोक ती ऐकतात-वाचतात. त्यामुळे ते एक पॉप्युलर पुस्तक आहे. ('पॉप्युलर' प्रकाशन नव्हे.) ज्ञानेश्वरी पॉप्युलर असल्यामुळे व्हावी तितकी दर्जेदार नाही. एकदा पुस्तक खपू लागले की लेखक खपला असे मानावे. शिवाय ज्ञानेश्वरी वाचून आनंद वाटत असल्याचीही कुणकूण आहे. तेव्हा तिचे एकदा पुनर्मूल्यमापन करण्याचे




## ज्ञानेश्वरीचे पुनर्मूल्यन

चालले आहे म्हणतात. लोकांना आनंद देणाऱ्या पुस्तकांबाबत असे काही करू इच्छिणाऱ्यांची त्यापेक्षा कसल्या तरी 'सत्कर्मीं रति वाढो' ही इच्छा. निवृत्ती, ज्ञानदेव, सोपान आणि मुक्ताबाई अशा या चारी भावंडांना लेखनाची आवड होती. बालवाङ्मयाला उत्तेजन देण्याची योजना व आकाशवाणीवर मुलांचा कार्यक्रम नसल्यामुळे ह्या मुलांनी लेखनात विलक्षण प्रगती केली. मात्र ह्या मुलांचे शिक्षण मराठीतूनच झाल्यामुळे महाराष्ट्रातल्या भक्तिपंथाच्या हायर स्टडीजसाठी अमेरिकेला वगैरे जाण्याचा योग आला नाही. त्यामुळे ज्ञानेश्वरांना डीपर एस्थेटिक एक्सपीरिअन्सेसकडे पाहण्याची संधी मिळाली नाही. शिक्षणही बेतास बात. त्यातून त्यांचा ग्रीक आणि फिलॉसफीचा अभ्यास फारच तोकडा पडला. ज्ञानेश्वरांनी मराठीचा उदो उदो केल्यामुळे ते प्रांतीय होते हे उघड आहे. "ना तरी इक्षुदंडु। की पाळितया गोडू। गाळीतया कडू" वगैरे म्हटले असले तरी तो महाराष्ट्रातलाच[1] ऊस त्यांना अभिप्रेत असावा.

ज्ञानेश्वरांनी जरी सामान्यांसाठी लिहिण्याचा आव आणला तरी मराठीचे शैलीकार म्हणून त्यांना फारसा मान देता येणार नाही. एकतर

---

१. 'महाराष्ट्रातील उसात साखरेचे प्रमाण सर्वांत अधिक असते.' — सहकारी साखर-कारखान्यांचा वार्षिक अहवाल.
'महाराष्ट्रातला सारा गोडवा फक्त उसात उरला आहे.' — आम्ही.

त्यांच्या काव्यात प्रतिमांचा अभाव आहे. किंबहुना, ज्ञानेश्वर हे कवीच नव्हेत. किंबहुना साहित्यिकच नव्हेत. कारण त्यांचे साहित्य बहुजन-समाजवादी प्रचारकी थाटाचे आहे. त्यांच्या साहित्याला कैवल्याचे परि-माणच नाही. ते फार ढोबळ आहे. पवाड्, आसकडि, दांगे, अविसाळें वगैरे कायच्या काही शब्द वापरावयाची त्यांना खोड आहे. शिवाय गीतेतील मूळच्या संस्कृत श्लोकांशी प्रामाणिक राहून त्यांना भाषांतर करता आले नाही. अर्थात सोळा वर्षांच्या वयाच्या मानाने त्यांचे संस्कृत पुष्कळच चांगले आहे. आणि मराठीही. आणि अध्यात्माची समजही. आणि योगविद्येचीही. तसे पाहू गेल्यास "खपाच्या दृष्टीने ज्ञानेश्वरीला मिळालेल्या यशातच त्याच्या अपयशाच्या कक्षा सामावल्या आहेत," असे महाराष्ट्रातल्या एक होतकरू विदुषी प्रा० अभया तुपे आपल्या 'ज्ञानेश्वर — एक अवमूल्यन' ह्या लेखात म्हणतात ते खरे आहे.

**यशामुळे अपयश**

ज्ञानेश्वर यांच्या ज्ञानेश्वरीवाचनाचे कार्यक्रम ठिकठिकाणी झाले. 'टाळियांचा गजर अपरंपार ओढविला.' अशी लोकप्रियता लाभल्यावर वाङ्मयाचा दर्जा खाली येणारच. त्यामुळे यानंतरचा 'अमृतानुभव' हा ग्रंथ तितकासा खपला नाही. हे बहुधा त्यांच्या मनाला लागले असावे. नंतर त्यांनी समाधी घेतली. लहान वयात फार लोकप्रियता मिळू नये. किंबहुना, लोकप्रियताच मिळू नये. म्हणजे सखोल असेल असे समजून लोक संशयाचा फायदा देतात. आणि मग "न्यून तें पुरतें। अधिक तें सरतें" वगैरे करून घेतात. त्यातूनही कोणी फारच धारेवर धरल्यास "ते खळांची व्यंकटी सांडो" म्हणता येते. वादात जो प्रथम दुसऱ्याला खळ म्हणतो त्याची सरशी होते. ज्ञानेश्वरीचा हा उपयोग अमान्य करून चालणार नाही. ज्ञानेश्वरांमागून कोणी ओवी लिहू नये अशी काही शतकांनंतर एकनाथांनी खटपट केली. पण त्यांचे कोणी ऐकले नाही. आम्ही ओवी लिहिली तर तुमच्या पोटात का दुखते, असा सरळ सवाल केला गेला. काही लोकांच्या मते ओवीहून मराठी साहित्यात व विशेषतः साहित्यिकांत 'ओवा'च अधिक प्रभावी आहे. ज्ञानेश्वरीपाठी मराठी ओवी लिहिणाऱ्याने अमृताचें ताटीं नरोटी ठेविली असे मानावे, असे एकनाथांच्या सटीप आवृत्तीत कुणीतरी लिहून ठेवले. आम्ही ओव्या लिहिल्या नाहीत तर आमच्या ताटात रोटी कोण ठेवील, असा प्रश्न विचारून तत्कालीन

कवींनी एकनाथांना हैराण केले. मग त्यांनी खुलासा केला. पण लोक बदनामी वाचतात, खुलासे वाचीत नाहीत, हे एकनाथांना ठाऊक नव्हते.

मुक्ताबाई ही चारी भावंडांतील सर्वांत धाकटी. हिने ताटीचे अभंग लिहिले आहेत. मुंबई ब आणि पुणे आणि सांगली उपकेंद्रांवर त्या अभंगांना दर आठवड्याला लावलेल्या नवीन चाली ऐकल्या असत्या तर तिने काठीचे अभंग लिहून एकेकाला झोडपून काढले असते. 'काठी उचला ज्ञानेश्वरा' असे म्हणून आपल्या भावाची मदत घेतली असती, असे आम्हांस वाटते.

ज्ञानेश्वराचा एक भाऊ सोपानदेव याने मात्र फारशी काव्यरचना केली नाही. तेराव्या शतकातली ही उणीव विसाव्या शतकात दुसऱ्या सोपान-देवांनी भरून काढली. ते एक बरेच झाले.

निवृत्तिनाथ हे ज्ञानदेवांचे वडील बंधू आणि गुरू. काही लोक चुकून त्यांना गुरुबंधू मानतात. पण तसे नाही.

दरवर्षी आळंदीहून ज्ञानेश्वराची पालखी पुण्यावरून पंढरपूरला जाते. मराठीचे प्राध्यापक आणि विद्यार्थी सोडून बाकीचे असंख्य लोक त्या पालखीबरोबर हडपसरपर्यंत जातात. काही लेखक म्हसोबाचौकीपासून ते लकीपर्यंत चालत येतात आणि वारीच्या आगळ्या अनुभूतीबद्दल लेख लिहितात. इथे मराठीचिये पुण्यनगरी कसल्या कसल्या लोकांचा सुकाळू आहे हे निवृत्तीचा ज्ञानदेवो काय जाणे? पुंडलीक वरदा हारि विठ्ठल.

## नामदेव

काहींच्या मते नामदेव शिंपी होता. काहींच्या मते तो डाकू होता. आमच्या मते तो कवी होता. आजच्या जमान्यात असता तर मराठी चित्रपट, आकाशवाणी, ग्रामोफोन कंपनी वगैरे क्षेत्रांत इतरांना नाव काढू दिले नसते. पण त्या काळी ही क्षेत्रे नव्हती. फक्त पंढरपूर, नाशीक, काशी वगैरे क्षेत्रे होती. तिथे मराठी संतांची कॉंपिटिशन जोरदार होती. पुन्हा मराठी लोकांत युनिटी नाही. नामदेव पंजाबात पॉप्युलर झाल्यामुळे महाराष्ट्रात खळबळ उडाली. अजूनही मराठी लेखकाला अन्य भाषेत लोकप्रियता मिळाली तरी तेच होते. आपल्या परंपरा आपण सहसा सोडत नाही. नामदेवाच्या कुटुंबात अभंग करणे ही जवळजवळ एकप्रकारची कॉटेज इंडस्ट्री होती. त्यांच्या एकूण प्रॉडक्शन आउटपुटचा तक्ता खाली देत आहो.

# नामदेव कॉटेज इंडस्ट्री
## प्रॉडक्शन आउटपुट

| अभंग करणाऱ्याचे नाव व नाते | अभंगसंख्या | शेरा |
|---|---|---|
| दामाशेटी (वडील) | २ कोटी | वयोमानामुळे ताकद कमी |
| गोणाई (आई) | ३ कोटी | नॉर्मल प्रॉडक्शन |
| नारोबा (सुपुत्र) | ३ कोटी | नॉ० प्रॉ० |
| विठोबा (सुपुत्र) | ३ कोटी | नॉ० प्रॉ० |
| महादा (सुपुत्र) | २॥ कोटी | काम अधिक करणे इष्ट होते |
| गोंदा (सुपुत्र) | २॥ कोटी | तेच |
| आऊबाई (सुकन्या) | १ कोटी १६ लक्ष | वय लहान |
| रंगाई (सुकन्या) | ९४ लक्ष | तेच |
| राजाई (पत्नी) | २ कोटी | स्टेडी |
| लाडाई, गोडाई, येसाई, साखराई (सुना) | ६ कोटी | व्यक्तिगत तपशील उपलब्ध नाही. |
| जनाई (दासी) | १२॥ कोटी | घर व अंगण झाडताना इतरांचे जे कागदाचे कपटे उडाले होते ते स्वतःच्या खात्यात जमा केले असावेत किंवा दळण्याकांडण्यासाठी विठ्ठल येत असे त्याचा ह्या अभंगांत हात असावा. |
| स्वतः विठ्ठल व रखुमाई (देव) | १॥ कोटी | ही एंट्री चुकीची वाटते. |
| नामदेव (कुटुंबप्रमुख) | ५४ कोटी ६९ लक्ष | कॅप्टन्स इनिंग्ज. |
| वह्द उत्पादन ९१ कोटी ७९ लक्ष अभंग | | |

(हे आकडे 'महाराष्ट्र सारस्वत' ह्या ग्रंथावरून घेतले आहेत. त्या ग्रंथाच्या लेखकाने ते ऑडिट करून घेतले असावेत.)

## नामदेव कॉटेज इंडस्ट्री
## दैनिक प्रॉडक्शनसह



**बसलेले (डावीकडून)** : राजाई, नामदेव (खुद्द), दामाशेटी, गोणाई, नारोबा, लाडाई
**पुढे बसलेले (डावीकडून)** : आऊबाई, रंगाई
**मागील रांगः उभे (डावीकडून)** : महादा, गोडाई, गोंदा, येसाई, विठोबा, साखराई, जनाई (दासी)
**त्याच्याही मागची रांगः उभे (डावीकडून)** : विठोबा, रखुमाई

(दुर्मिळ फॅमिली आल्बममधून)

---

आता हे सारे कुटुंब अभंग रचण्यात इतके बिझी असल्यावर नाम-देवाला कपडे शिवावयाला वेळ कुठला ? इतके अभंग रचिताना त्याचेच

टाके ढिले होत असतील. पुन्हा त्या अभंगांना चाली लावून गावयाच्या[२] शेवटीशेवटी घरातली सगळी मंडळी अभंगांतच बोलू लागली. नामदेवाची आई इतर आयांप्रमाणे "अरे काही कामधंदा बघ बाबा — कसं व्हायचं?" असे न म्हणता त्याला अभंगातच रागे भरायची, "नाम्या हें रे नव्हे भलें। घर त्वां बुडविलें कुळासहित." साहित्याचे एवढे उत्पादन करणारे दुसरे कुटुंब आमच्या पाहण्यात नाही. त्यानंतर काही मंडळे स्थापून कवींनी उत्पादनवाढीचे प्रयत्न केले होते. परंतु त्यांना हा झपाटा जमला नाही.[३] इतकी प्रचंड अभंगसंख्या पाहून, नामदेवाने कवींच्या घरांवर डाके घालून त्यांचे संग्रह पळवले असतील अशी कल्पना झाल्यामुळे त्याला लोक डाकू समजतात. ह्या आख्यायिकेत काही तथ्य नाही. साहित्याच्या क्षेत्रात कोणालाही कोणाचे बरे बघवत नाही एवढाच ह्या आख्यायिकेपासून बोध घ्यायचा. एकतर दरोडेखोरीचा धंदा इतका जोसात चाललेला असताना माणूस उगीच अभंगांच्या मागे कशाला लागेल? लोकांनी कारणाशिवाय त्याला नावे ठेवल्यामुळे तो वैतागून आपले अभंग घेऊन पंजाबात गेला. तिथे सरदारजींना अभंग ही गोष्ट नवी होती. भांगडा, गिद्दा, टप्पे वगैरे त्यांना ठाऊक होते. टाळ-वीणेवरचे अभंग ऐकल्यावर खूष होऊन ग्रंथसाहेबात त्यांतले अभंग घेतले. एके दिवशी त्यांतला एक सरदारजी म्हणाला, "ए गल सुण, त्वाडा नाम क्या है जीऽऽ"

"तुम कुछ भी नाम देव हमकू, चलेगा" असे ह्याने सांगितले. (त्या वेळी ह्याची हिंदीची फक्त प्रथमाच पास झाली होती.) सरदारजीला वाटले, ह्याचे नावच 'नामदेव'. तेव्हापासून नामदेवाला नामदेव म्हणू लागले. एकनाथाचे जसे पाळण्यातले नाव एकनाथ नव्हते, तसेच नामदेवाचे मूळ नाव दुसरेच असावे. कारण नामदेवापूर्वी महाराष्ट्रात कुणाचेही नाव 'नामदेव' असे असल्याचे ऐकिवात नाही. मग ह्याचे नाव नामदेव कुठून ठेवणार?

---

२. मराठी इतिहासाचे बरेचसे संशोधन इंग्रजांनी केल्यामुळे नामदेव अभंग गाणारा म्हणून त्याचे 'सिंगर' असे वर्णन असेल व त्यानंतर 'सिंगर' हे शिवण्याचे यंत्र म्हणून त्याचा शिंपीकामाशी संबंध जोडला असेल. मराठी विद्वत्तेचे अनेक अद्भुत आविष्कार पाहता हे अशक्य वाटत नाही.

३. आता मुंबईत 'साहित्य सहकार' अशी एक फक्त लेखकांची वसाहत होत आहे. तिथे सहकारी पद्धतीवर साहित्याचे उत्पादन होणार असल्याचे ऐकतो. यापुढे कविता, कथा वगैरे त्या सहकारी सोसायटीतून घ्याव्या लागतील. साहित्य सहकार या लेखकांच्या वसाहतीपुढे 'साहित्य सहनकार' अशी वाचकांची हाउसिंग सोसायटी व्हावी।



# तेराव्या शतकातले काही ग्रंथकार

## त्रोटक परिचय

**विसोबा खेचर**: खेचर ह्या आडनावाचा हा एकच कवी.

**परसा भागवत**: भागवत ह्या आडनावाचा साहित्यिक दबदबा ह्याच्यापासून सुरू झाला.

**चोखा मेळा**: मेळ्याची पद्धत याने शोधून काढली. मंगळवेढ्यातली कान्होपात्रा ह्याच्या मेळ्यात होती. सिनेमा आल्यावर मेळे बंद पडले. हल्ली मेळ्यांना मराठी चित्रपट किंवा संगीत नाटक म्हणतात.

**सावता माळी**: अरणभेंडी येथे याचा भक्तीचा मळा होता. पण त्यात तो फक्त कांदा आणि मुळाभाजी लावत असे असे दिसत. त्याचा जन्मशक ११७२ असा चरित्रकार देतात; 'परंतु तो संशयित वाटतो' असे डॉ० शं० गो० तुळपुळे पुरवणीकार यांचे मत आहे. (महाराष्ट्र सारस्वत, पुरवणी, पृ० ७४२.) आम्हांला चरित्रकार नेहमीच संशयित वाटतात. पण जन्मशक ११७२च बरोबर वाटतो. अर्थात संशयित वाटण्याला पुरवणीकारांनी पुरावा दिला नसल्यामुळे संशयातीत वाटावयाला आम्हांलाही पुरावा देण्याची आवश्यकता नाही हे ओघानेच आले.

**गोरोबा कुंभार**: तत्कालीन साहित्यिक यांना 'काका' म्हणत. मराठी साहित्यातील गोरा कुंभार हा आद्य काका. त्यानंतर सार्वजनिक काका, काकासाहेब खाडीलकर, काकासाहेब गाडगीळ, काकासाहेब लिमये वगैरे अस्सल मराठी व काका कालेलकर वगैरे कोकणीवादी मराठी काका झाले आहेत. डोक्यावर थापटणे आपटून आतली विद्वत्ता

शोधावयाची ट्रिक गोरोबाकाकांना येत असे. हल्लीच्या काळात त्यांची ही ट्रिक फेल गेली असती. कारण थापटणे मोडले असते.

**राका कुंभार :** ह्या कुंभाराचा आवा कसा होता ठाऊक नाही, पण ह्याची आवा मात्र जबरी होती, असे महाराष्ट्र सारस्वतकारांनी सांगितलेल्या गोष्टीवरून वाटते. ती गोष्ट अशी : एक होता राका. त्याची बायको बाका. एकदा राकाबाका रानात गेले. वाळकी लाकडे गोळा करायला. तिथे पडले होते सोन्याचे कडे. राका वैराग्यशील. बाका काही झाले तरी बाई. त्या सोन्याच्या कड्याचा तिला मोह होईल म्हणून राकाने त्या कड्यावर माती लोटली. बाकाने ते पाहिले व विचारले, "त्या सोन्याच्या कड्यावर माती का लोटलीत?"

"न जाणो ते सुवर्णाचे कडे उचलण्याचा तुला मोह होईल." राका कुंभार असला तरी ब्राह्मणी अपभ्रष्ट मराठीवर त्याची चांगली कमांड होती.

नवऱ्याचे हे उद्‌गार ऐकून बाका म्हणाली, "आहाहा! अहो, एवढे विरक्त म्हणवता आणि सोने आणि माती ह्यांच्यात भेदभाव करता?"

राका चूप बसला. राकावर नेहमीच असा बाका प्रसंग येत असे. (सोने आणि माती ह्यांच्यात फरक न करणाऱ्या बाकाबाईने ते सोन्याचे कडे माती म्हणून हाती घेतले असेल असा आमचा नम्र अंदाज आहे.) अशा वेळी राका कुंभार ह्या आवाचा नाद सोडून दुसऱ्या आव्याकडे वळत असे. मडकी घडवीत असे व अभंग करीत असे. मडकी अभंग नसत. गाण्याचे अभंग.

**सजन कसाई :** जनतेसाठी रक्त सांडणारा आद्य मराठी लेखक. ह्याच्या साहित्याला आगळी धार होती. सजन कसायाइतका दुसऱ्या कुठल्याही कवीचा मास-कॉन्टॅक्ट नव्हता.

**चांगदेव :** "हे चौदाशें वर्षे जिवंत होते अशी समजूत आहे." (महाराष्ट्र सारस्वत, पुरवणी.) ह्यांना कुठल्या शतकात टाकावे ते कळत नाही. (आम्ही.) "चांगदेवाचा जन्मशक ठाऊक नाही. परंतु त्याने शके १२४७ मध्ये गोदातीरी पुणतांबे येथे समाधी घेतली हे निश्चित आहे." (महाराष्ट्र सारस्वत पुरवणीकार डॉ० तुळपुळे, पृ० ७४३.) आता १४०० वर्षे जगलेल्या चांगदेवाचा १२४७व्या शकात मृत्यू झाल्यामुळे त्याचा जन्मशक असणेच शक्य नाही. कारण तो जन्माला आला तेव्हा शकच नव्हता. तरी चांगदेव जन्माला आला होता की

नाही याची चिंता न करता त्याच्या पुण्यतिथीचाच फक्त उत्सव करावा. जयंती किंवा मयंती ह्यांपैकी एक झाल्याशी कारण. आपण आपले 'भक्तिमार्गाचा महाराष्ट्रीय जीवनावर प्रभाव' हे व्याख्यान तयार ठेवावे. केव्हाही उपयोगी पडते.

चांगदेवाला, ज्ञानेश्वरांना पत्र लिहिताना 'चिरंजीव' म्हणावे की 'तीर्थरूप' म्हणावे हे न कळल्यामुळे त्याने पत्र कोरेच धाडले. वास्तविक 'प्रिय ज्ञानेश्वर' एवढे साधे सुचू नये याचे आश्चर्य वाटते.

त्याशिवाय नरहरी सोनार, जोगा परमानंद, जगमित्र नागा, साळ्या रसाळ, विठ्ठल गलंड वगैरे कवी झाले. त्या वेळी साहित्यसंमेलने असती तर ह्यांना फार तर परिसंवादात आयत्या वेळचे वक्ते म्हणून, आमंत्रित विद्वानांच्या अनुपस्थितीमुळे, स्टेजवर येण्याचा चान्स मिळाला असता.

त्या काळी जनाबाई, चोखा मेळा यांची नारी श्रीमती चोखा मेळा, श्रीमती गोणा दामाशेट, राजाई नामदेव, कान्होपात्रा मंगळवेढेकर वगैरे स्त्रीलेखिकाही बऱ्याच प्रसिद्धीला आल्या होत्या. पुरुष मंडळी सतत काव्यगायनांच्या दौऱ्यावर असल्यामुळे त्यांना बरा वेळ मिळत असे.

असो.





# चौदावे शतक

ज्ञानदेवांच्या अमृतवाणीने पुनीत झालेल्या महाराष्ट्रापुरते बोलावयाचे म्हणजे या महाराष्ट्रात चौदावे शतक हे तेराव्या शतकानंतर आणि एक प्रकारे पंधराव्या शतकाच्या काहीसे आधी आले. ह्या शतकाला एक प्रकारचे आगळेपण आहे. "चौदाव्या शतकांत पुण्याची मूळ वस्ती बारा जणांची होती हें प्रसिद्धच आहे." (महाराष्ट्र सारस्वत, पृष्ठ १६४.) महाराष्ट्रातल्या तात्त्विक मतभेदांचे हे बारा आद्य प्रवर्तक. ह्यावरून पुणे शहराची सुरुवातच मुळी ह्या बारभाईंच्या कार्यकारी मंडळाने झाली आणि म्हणूनच पुणे शहराची स्थापना नगर म्हणून न होता 'संस्था' म्हणूनच झाली. त्यामुळे इथला प्रत्येक नागरिक हा जन्मतःच 'संस्थापक' असतो.

ह्याच काळात देवगिरीचे राज्य, दरबारात साहित्यिकांची भरती करून रामदेवरावांनी बुडविले. अल्लाउद्दीन खिलजी धूळ उडवीत आला. धूळ डोळ्यांत गेली आणि कोण आले आहे ते कळेना. चिखलफेकीची साहित्यिकांत आदत होती; पण धूळफेक मात्र वाचकांच्या डोळ्यांत करावयाची असल्यामुळे स्वतःला अनुभव नव्हता. त्यामुळे गोंधळ उडाला. अल्लाउद्दीन वस्ताद होता. त्याने फक्त सैनिक आणले, साहित्यिक आणले नाहीत. साहित्यिकांना दुसऱ्याने घोड्यावर चढवावे तेव्हा ते चढणार ही सवय त्याला ठाऊक होती. आणि एकदा चढवले की शत्रूऐवजी एकमेकांना खाली पाडण्याचा प्रयत्न करतील हेही तो पक्के जाणून होता. म्हणून तो फक्त लढाई करणारे सैनिक घेऊन आला. शेवटी अल्लाउद्दिनाचा हल्ला झाला हे कळल्यावर दरबारातले समग्र कवी समरगीते लिहायला निवांत जागी गेले. गीतांना चालीबिली लावून ते परत आले तेव्हा देवगिरीची




देवगिरीतील संस्कृतिसंगम

दौलताबाद झाली होती. आता सगळ्यांना फारसी शिकणे आले. बहुतेक साहित्यिक त्या उद्योगाला लागले. पूर्वीच्या मराठीत राक्षसी, यक्षी, पैशाची, मागधी वगैरे शब्द होते; आता फारसी, अरबी वगैरे आले. एक प्रकारचा संस्कृतिसंगम झाला. आणि लोक गोडबोले आणि इब्राहिमी जर्दा एकदम चोळून खाऊ लागले. मात्र बाटवाबाटवी होवो, काय वाटेल ते होवो, आपण बरे नि आपले काम बरे ह्या धोरणाने वागून बहुतेक कवी रुक्मिणीस्वयंवर, श्रीकृष्णषोडषसहस्रविवाह, व्याकरणाचे नवे नियम, वगैरे विषयांवर दिवशी गेला बाजार हजार ओळी ह्या नेटाने लिहीत होते. मधूनच एखादा यवन बाटवावयाला किंवा मुली पळवावयाला वगैरे आला तर त्यांच्या लिखाणात व्यत्यय येई.

**भीष्माहार्य**

काही चतुर मंडळींनी नव्या राज्यकर्त्यांचा उगीच रोष नको म्हणून व्याकरणासंबंधी ग्रंथ, मार्गदर्शिका वगैरे निरुपद्रवी परंतु न खपणारे

म्हणून विद्वत्तेत मोडणारे लेखन सुरू केले. भीष्माहार्य नावाच्या अशाच एका लेखकाने तीसबत्तीस ग्रंथ बसल्या बैठकीला लिहिले. त्यांत ब्रह्मविद्येपासून मूर्तिज्ञानापर्यंत आणि जयदेवाच्या गीतगोविंदावरील मराठी गाइडपासून सुलभ व्याकरणापर्यंत सर्व विषय आहेत.[१] इ० स० १३९९ नंतर १४०० साल लागल्यामुळे हे चौदावे शतक संपले.



१. ह्या भीष्माहार्याचे एक वंशज हल्ली पुण्यात असून दिवसाकाठी डेमाय आकाराचे आठ फॉर्म होतील इतके लेखन करीत असतात असे ऐकतो. इतक्या फॉर्मात येऊन पुस्तकांच्या राशीच्या राशी रचणारा हा आधुनिक भीष्माहार्य म्हणावा लागेल. महानुभावांपासून बाजारभावांपर्यंत कोणत्याही विषयावर त्यांची लेखणी आणि वाणी अस्खलित चालते.



# एकनाथ

"एकनाथ हें पाळण्यांतलें नांव दिसत नाहीं...थोरल्या बाजीराव-साहेबांचें लहानपणाचें नांव विसूभाऊ हे कितीकांना ठाऊक आहे!" (महाराष्ट्र सारस्वत, पृष्ठ १९३, तळटीप.)

**चरित्रनायकाचे बालपण आणि म्हातारपण**

थोरल्या बाजीरावसाहेबांचे लहानपणाचे नाव विसूभाऊ हे आम्हांलाही ठाऊक नव्हते हे नमूद करताना आम्हांस खेद होत आहे. विसूभाऊ हे फक्त इतिहासकार राजवाड्यांचे लहानपणापासून मोठेपणापर्यंतचे नाव आहे असे आम्ही समजत होतो. वाङ्मयाचे इतिहास वाचावे तेव्हा कुठे ही मोठ्यांची छोटी नावे कळतात. एकनाथांचे पाळण्यातले नाव एकनाथ नव्हते. दुसरे काहीतरी असावे. लहानपणी "एकनाथाची बुद्धि फार तीव्र होती." *(महाराष्ट्र सारस्वत, पृष्ठ १९३.)* पण "गणित कच्चे होते." (आम्ही.) हिशेबठिशेब करावयाला वेळ लागावयाचा. एका पैशाची चूक शोधून काढावयाला एका रात्रीचा ओव्हरटाइम करावा लागला. (त्यामुळेच लहानपणीचे नाव मागे पडून 'एक'नाथ हे नाव पडले असेल काय?) हेडक्लार्क तरी किती सांभाळून घेणार? हल्ली बरेच सरकारी नोकर हापिसच्या कागदांवर कविता, नाटके, तमाशे वगैरे लिहितात त्याप्रमाणे कारकुनी फडात बसून एकनाथही भारुडे वगैरे लिहीत असावे. शेवटी गणमात्रांचे हिशेब जुळविताना हे हिशेब चुकावयाला लागले व नोकरीला मुकून हरि[1] हरि करीत घरी बसण्याची पाळी आली. एकनाथाच्या

---

१. उद्योग नसल्यामुळे आपण हरि हरि करतो असे लोकांना वाटू नये म्हणून त्यांनी आपल्या मुलाचे नाव हरिपंडित असे ठेवले.

खापरपणजोबांनी म्हणजे भानुदासांनी विजयनगराहून विठ्ठलाची मूर्ती आणली. "तें विजयनगर शहर हल्लीच्या लंडन, न्यूयॉर्क, पारिस वगैरे शहरांपेक्षाही अवाढव्य होतें" असे महाराष्ट्र सारस्वतकार भावे यांनी लिहिले आहे. असल्या शहरातून एखादी कॅडिलॅक, रोल्सरॉइस वगैरे न आणता विठ्ठलाची मूर्ती आणण्याचे भानुदासांना काय सुचले कळत नाही. निदान महाराष्ट्रात भरपूर सोने तरी आणावयाचे म्हणजे उद्योगधंद्यांत गुंतवता आले असते आणि पुढील पिढ्यांची सोय झाली असती. विठ्ठलाची मूर्ती आणल्यामुळे देवापुढे काय पैसा, दोन पैसे पडतील तेवढ्यात पुढल्या वंशजांना भागवावे लागले. आणि उत्पन्न वाढल्यावर देऊळ बडव्यांच्या ताब्यात जाऊन एकनाथांना 'एका जनार्दनीं भोग प्रारब्धाचा' म्हणत बसावे लागले. एकनाथांना श्रीखंड्या नावाचा चांगला नोकर मिळाला होता तेवढेच समाधान. मालकांचे संसारात लक्ष नाही म्हटल्यावर एक तर नोकर त्यांची विड्यांची बंडले पळवतात. पण श्रीखंड्या तसे न करता निमूटपणे पाणी भरावयाचा. एकनाथांच्या घरात बरीच माणसे असावीत. कारण श्रीखंड्या दिवसभर नुसता पाणी भरावयाचे काम करीत असे. (पाहा: 'भाव तोचि देव' नाटक.) एकदा एकनाथाने गंगेचे पाणी गाढवाला पाजले म्हणून ब्राह्मण भडकले. एकनाथ सर्वत्र समभावाने पाहत असे. त्यामुळे त्याला गाढव ब्राह्मणासारखे वाटले एवढी साधी गोष्ट ह्या गाढवांना का कळू नये? आपल्याला ब्राह्मण समजून पाणी पाजण्यात आले हे समजल्यावर त्या गाढवाने जलसमाधी घेतली. भाविक लोक जलसमाधीसुद्धा पाहायला जातात.

**भागवतधर्माचे दूध**

भागवतधर्मावर एकनाथांचे किती प्रेम होते यावरचे महाराष्ट्र सारस्वतकारांचे भाष्य केवळ अप्रतिम आहे: "श्रीकृष्णानें[२] भागवतधर्माचें

---

२. म्हणजे श्री० पु० भागवतांनी नव्हे. हा श्रीकृष्ण गोकुळात मौज करणारा. 'हू ज हू'मधील माहिती 'वाय'मधे सापडेल.

यादव श्रीकृष्ण वसुदेव: जन्म मथुरा. बालपण पहिल्या दिवसापासून गोकुळ. बालपणी मुरलीवादक म्हणून प्रसिद्धी. डेअरी फार्मिंगचे प्राथमिक शिक्षण. पुढे सांदीपनी विद्यालयातून एस० एस० सी०. त्यानंतर राजकारणात प्रवेश. कंस, चाणूर वगैरेंचा पराभव. भारतीय युद्धात प्रथम मिनिस्ट्री ऑफ फॉरेन ॲफेअर्समधून पांडवांतर्फे कौरवांकडे ॲम्बेसडर. तिथे वाटाघाटी फिसकटल्यानंतर प्रत्यक्ष आर्मी जॉइन केली. ट्रान्सपोर्ट खात्यात सारथ्याच्या हुद्यावर नेमणूक.

ग्रंथरचना: 'भगवद्‌गीता' हा अर्जुनाच्या साहाय्याने रचलेला संवादात्मक कवितासंग्रह.



डेअरिंगबाज दुग्ध व मेवा भांडार
प्रोप्रायटर : एकनाथ

दूध पाजून त्याचे (अर्जुनाचे) शरीरांत चैतन्य आणलें...श्रीकृष्णानें पाजलेल्या या दुधाचे जे थोडे ओघळ बाहेर[३] आले ते नीट धरून ज्ञानेश्वरांनीं महाराष्ट्राला महाराष्ट्र-भाषापात्रांत साठवून दिले...पुढें या दुग्धरसाचा उत्तम मेवा[४] बनवून महंमदी धर्मानें उच्छाद मांडला असतांना एकनाथानें त्याचा रतीब महाराष्ट्राला लावला आणि त्याला आपल्या काळजाचा उबारा देऊन त्यांत हालचाल सुरू केली.'' (हे वाक्य महाराष्ट्र सारस्वताच्या १९७व्या पानावरचे आहे, आमचे नव्हे.) आम्हांला फक्त एकच शंका आहे, की मेव्यात हालचाल सुरू झाली की तो आमचे कुटुंब फेकून देते. दुधाचा हालचाल करणारा एकच पदार्थ आम्ही पाहिला आहे : किडे पडल्यामुळे बशीत हालचाल करणारे गॉरगनझोला नावाचे 'चीझ' किंवा पनीर. असो.

**स्वप्नात ज्ञानेश्वर**

एकनाथांच्या स्वप्नात ज्ञानेश्वर आले आणि ज्ञानेश्वरीची नवी

---

३. म्हणजे एकतर श्रीकृष्णाला नीट दूध पाजता आले नाही. किंवा अर्जुन भेदरला होता म्हणून त्याचा हात दूध पिताना थरथरत असावा.

४. एकनाथांनी हे काम श्रीखंड्याकडून करून घेतले असावे. तो श्रीखंड उत्तम करीत असावा. मेवा करणे त्याला कठीण नव्हते.

आवृत्ती काढावयास सांगितले. त्यानंतर हल्लीच्या हल्ली ज्ञानेश्वरीच्या बऱ्याच आवृत्त्या निघाल्या आहेत. आणखीही निघत आहेत. परवाच कुणीतरी शंभर रुपये भरा म्हणजे दहा वर्षांनी फुकट ज्ञानेश्वरी मिळेल आणि वीस वर्षांनी शंभर रुपये जसेच्या तसे परत मिळतील म्हणून सांगत आले होते. आम्ही आमचे शंभर रुपये पोष्टात ठेवले. तेसुद्धा परत मिळतात. मात्र ज्या नव्या ज्ञानेश्वऱ्या विद्वानांच्या टीपांसह निघतात त्या प्रकाशक किंवा टीपालेखक जागेपणी एकमेकांना भेटल्यामुळे. प्रकाशकांच्या स्वप्नात फक्त मुद्रक बिले मागत येतात असे ऐकिवात आहे. पंधराव्या शतकात परिस्थिती जरा निराळी होती. साहित्यिक दिवसा भेटले नाहीत तर रात्री एकमेकांच्या स्वप्नात जावयाचे.

एकनाथांनी "असा कसा देवाचा देव बाई ठकडा। देव एका पायानें लंगडा॥" वगैरे शिशुगीतेही लिहिली. परंतु ती शिशूंपेक्षा त्यांच्या आयाच शिशूला निमित्तापुरताच पुढे घेऊन आल्यागेल्याला गाऊन दाखवतात हे पाहिल्यावर ते सरळ भारुडाकडे वळले आणि "दादला नको ग बाई" वगैरे गाणी लिहिली. शाहीर साबळे ती म्हणतात. ऐकनाथांनी त्यांना स्वप्नात येऊन ती म्हणावयाला सांगितले की काय याविषयी पुरावा उपलब्ध नाही.

"एकनाथ शके १५२१च्या शिमग्यानंतर हयात नव्हते हें मात्र 'बहुतेकांस' मान्य आहे" असे महाराष्ट्र सारस्वताचे तळटीपाकार म्हणतात. कारण १५२२च्या शिमग्यातल्या भारुडांच्या कार्यक्रमांची रॉयल्टी त्यांना मिळाल्याचा पुरावा उपलब्ध नाही. "इ० स० १८५८च्या नवनीताच्या आवृत्तींत एकनाथाचा निधनशक १५४६ असा होता. इ० स० १९१०च्या आवृत्तींत हा शक १५३१, म्हणजे इ० स० १९४५चे नवनीतांत हा १५२१ असा बरोबर दिला जाईल असें गणितानें निघतें." असे तळटीपकारांचे म्हणणे आहे. यावर आमचे म्हणणे असे, की एकनाथाचा निधनशक प्रत्येक आवृत्तीत असा मागे मागे जात राहिला तर काही आवृत्त्यांनंतर एकनाथाचा मृत्यू त्यांच्या जन्मानंतर न होता आधीच झाला होता असे ठरेल. ह्यावरून आम्ही प्रकरणाच्या सुरुवातीला एकनाथाचे गणित कच्चे होते असे म्हटले त्यास पुष्टी मिळते. स्वतःची जन्मतिथी नाही तर नाही, निदान मृत्युतिथी अचूक लिहिता येण्याइतकेही त्यांना गणित कळत नव्हते. उगीच नाही एका पैशाच्या चुकीसाठी रात्रभर हिशेब करीत बसले! अकाउंटन्सीची परीक्षा कधीच पास झाले नसते.

जनार्दनस्वामींनी फिलॉसॉफी आणि मराठी घ्यावयाला लावल्यामुळे निभाव लागला. व्यवहारज्ञान एकूणच कमी म्हणून गावातल्या महारांनाच ब्राह्मण समजून जेवावयाला घरी घेऊन आले आणि गाढवाला ब्राह्मण समजून पाणी पाजले.

एकनाथांचे कौटुंबिक जीवन कसे होते ह्याचा अंदाज त्यांच्या काही ओळींवरून लागतो. "दिली स्थिती आहे तैशापरी राहे" वगैरे ओळी जरा चिंत्य आहेत. चिरंजीव हरिपंडित नाटक कंपनीत जावयाची तयारी करीत असावेत. एकनाथांप्रमाणे ते घेरा, शेंडी वगैरे न ठेवता लांब केस वाढवून पठाण किंवा हल्लीच्या पोरींप्रमाणे मानेबरोबर कातरीत. (पाहा: 'प्रभा-त'च्या 'धर्मात्मा' बोलपटातील हरिपंडित के० नारायण काळे.) केस लांब वाढवण्यात एक तर हरिपंडिताचा नाटकात पळून जाण्याचा विचार असावा किंवा 'घेरा डालो'ला विरोध असावा. घरात मुलाचा असा विरोध आणि कुटुंब गिरिजादेवी कानडी. तिने मराठी भ्रतार केल्यामुळे भाषिक अडथळे निर्माण झालेले. कीर्तन किंवा भारुडांचे प्रोग्रॅम आटपून यावयाला रात्रीचा उशीर झाला तर वाड्याचे दार उघडावयालासुद्धा येत नसत. "बया दार उघड" हे प्रसिद्ध गीत ह्या अनुभूतीतूनच आकारले असावे. तात्पर्य, घरात बोलायला बायको असून नसल्यासारखी आणि हरिपंडिताने नाटकात जाणार म्हणून अबोला धरलेला. श्रीखंड्या पाणी आणावयाला जातो असे सांगून नदीवर भटकावयाला जावयाचा. नाथ घरात सदैव एकटे. म्हणून त्यांना लोक एकोपंत म्हणू लागले. शेवटी त्यांनीही 'एका' ह्या टोपणनावाने लिहावयाला सुरुवात केली. त्यातून एकनाथ हे नाव पडले असे आमचे संशोधन आहे. आमचे संशोधन नावापुरते आहे असे काही कुत्सित टीकाकारांचे मत आहे. मराठी साहित्यात संशोधन दोनच प्रकारचे असते असे आमचे मत आहे: एक तर नावापुरते किंवा नावामागे डॉ० लावण्यापुरते. एकनाथांचे नाव काहीही असो, पण थोरल्या बाजी-रावांचे लहानपणाचे विसूभाऊ होते हे मात्र कोणी विसरू नये.





# एकनाथपंचक

गट करून राहण्याची साहित्यिक प्रवृत्ती जुनी आहे. एकनाथांच्या गटात (१) विठा रेणुकानंदन (२) जनी जनार्दन (३) रामा जनार्दन आणि (४) दासोपंत असे चौघे होते. अशी पंचके आजही काढता येतील. एकनाथपंचकातील सर्वांत प्रसिद्ध कवी म्हणजे दासोपंत.

## दासोपंत

दासोपंतांचे लहानपणीचे नाव दासूभाऊ असावे असे आम्हांस वाटते. पुढे त्यांना दासोपंत म्हणू लागले. दासोपंतांचा मूळ धंदा पासोड्या विकण्याचा असावा. मराठीचा अतिशय मोठा अभिमानी. पंधराव्या शतकात जन्मल्यामुळे वाया गेले. नाहीतर संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीत दैनिक, सायंदैनिक, साप्ताहिक, पाक्षिक, मासिक आणि दिवाळी अंक ह्या बुवाने एकट्याने लिहून काढले असते. भाषा अस्सल मराठी होती. संस्कृतचे व त्यांचे शाळेत कुठेतरी बरेच बिनसले असावे. (नाहीतरी त्या भाषेत व्याकरण, अनूसीन पॅसेज, ल्यबन्त, तुबन्त वगैरे लफडीच फार.) संस्कृत भाषा थोर म्हणणाऱ्यांना "ऐसिया मूर्खा मुंडणें। किती आतां ॥" असे म्हणणाऱ्या दासोपंतांची शैली मराठी वृत्तपत्रीय वाङ्मयात बरोबर शोभली असती. नुसत्या पाषाणाला –

> गोटा, गोटली, घोटाळा। चिरा, बंडा, सिरसाळा।
> कोदवा, किनरी, म्हैसाळा। रत्ननिळू॥
> खवला, मुरवाळा, कुरुंदु। सेल, गारगोट्या, हेदु

— इतके मराठी शब्द आहेत हे दाखवून देणाऱ्या कवीची ताकद काय वर्णावी? पण पाषाणाला मराठीत 'दगड'सुद्धा म्हणतात हे दासोपंतांना ठाऊक नसावे. चालावयाचेच. मुरवाळा, कुरुंदा वगैरे म्हणतात हे आम्हांला कुठे ठाऊक होते म्हणा! कोणाला काय ठाऊक असते, कोणाला काय असते. आता ज्याची मराठी भाषा इतकी तयार त्याला व्यापार जमणे अवघड होते हे उघड आहे. त्यामुळे पासोड्यांचे गठ्ठे पडून राहिले व धंदा बसला. पण दासोपंत गप्प बसले नाहीत. त्यांनी एकदम कापडी बांधणीचे ग्रंथ लिहावयाला सुरुवात केली. धर पासोडी की लिही हा धोशा चालू ठेवला. हे सारे मराठीत. नुसत्या गीतेवर पाचसहा टीका. एकेक टीका वीस हजार ते सव्वालक्ष ओव्यांची. लोक उगीच कुठे वसंत व्याख्यानमालेत 'मराठी वाङ्मय: काल, आज व उद्या' ह्याच्यावर व्याख्यानालाच या, साहित्यसंमेलनात परिसंवादात बोला, कुणाच्या तरी सत्कारसमारंभात भाषण करा वगैरे त्रास द्यावयाला येत. म्हणून सकाळी उठले की चार पासोड्या खांद्यावर मारून थेट डोंगरावर जाऊन बसावयाचे आणि तिथे लिहावयाचे. सांजच्याला पासोड्या कवितांनी भरलेल्या. दुसऱ्या दिवशी घे पासोड्या की नीघ डोंगरावर. कडुलिंबाची पाने आणि फळे खाऊन राहावयाचे. ओव्या लिहिण्यात इतका वेळ गेल्यावर घरात इतर काही शिजण्याची शक्यताही तितकीच असणार हा भाग अलाहिदा. मराठीचा अभिमान हवा तर असा. शिवाय पासोडीवर लिहिल्यामुळे लिखाणात विलक्षण सूत्रबद्धता आहे. कथानकाचा धागा तुटू दिला नाही. पुढेपुढे पासोड्या संपल्या तरी ओव्या संपेनात. मग आठ पाइंटचा बारीक टाइप धरला. आणि 'पंचीकरण' नावाचा सबंध ग्रंथ एका अडीच हात रुंद अशा पासोडीवर लिहिला आहे. "त्या पासोडीचें टोक भिजवून तीर्थ दिलें असतां ताप, पिशाच्चबाधा वगैरेपासून सुटका होते" असे महाराष्ट्र सारस्वत-कारांनी लिहिले आहे. पोटदुखी ह्या साहित्यक्षेत्रात वारंवार उद्भवणाऱ्या साथीच्या रोगावरही त्याचा इलाज करून पाहण्यासारखा आहे. आता पासोडीवर कविता करणारे कवी राहिले नाहीत. एकाने फक्त 'चिंधी'वर केली, तेवढीच त्याला जन्मभर पुरली.

दासोपंताने एकूण सव्वालक्ष पदे केली. त्यांना रोज दोन पैशांची शाई लागत असे असे म्हणतात. पंधराव्या शतकात दूध पैशाला तीन शेर होते. दारात म्हैस आणली तर दोन शेर. जिथे दूध पैशाला दोनतीन शेर होते तिथे दोन पैशाला घंघाळभर शाई निश्चित. दासोपंताचे सकाळी भरलेले



आपल्या दैनिक कामात गर्क दासोपंत

घंघाळ संध्याकाळी रिकामे होई. नोकराला ढबू पैसा देऊन लगेच शाईच्या पुड्या आणावयाला पिटाळीत. असला घंघाळ-घंघाळ शाया वापरणारा शायर त्यानंतर झाला नाही. शाईच्या धंद्याला एवढे उत्तेजन देणाऱ्या ह्या महाराष्ट्रवादी कवीबद्दल मराठी शाई-कारखानदारांना काहीच कौतुक नसावे ह्याचे नवल वाटते. याखेरीज दासोपंतांनी उपनिषदर्थप्रकाश, स्तोत्रे, अष्टके, वगैरे संस्कृत भाषेतही ग्रंथरचना केली. आजही मराठीचे कट्टर अभिमानी मुलांना इंग्रजी माध्यमाच्या शाळेत घालतात. त्या वेळी तर काय, पंधरावे शतक होते. शिवाय संस्कृतसाठी दासोपंतांनी पासोड्या वापरल्या नाहीत, कागद वापरला, म्हणून हा खुलासा.

दासोपंतांच्या अस्सल मराठीचा हा नमुना पाहण्यासारखा आहे :

पीतगंध ललाटीं। वरी कस्तुरीची द्रिबोटी।
आरक्ताक्षता निहटी। रेखिलिया जाणो ॥
श्वेतचंदनें डवरिलें। सर्वांसि उदें धूपिलें।
मस्तक भरुनी फुलें। चंपकाचीं॥"

मराठीचा असा अभिमान त्यानंतर फक्त विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी 'आय ॲम दि शिवाजी ऑफ मराठी' असे अस्सल मराठीत सांगून व्यक्त केला होता. थोडक्यात म्हणजे, व्हाटेव्हर यू कॅन राइट इन मराठी अक्षराज ईज मराठी! असे केले तरच 'यशाची पुढे थोर आशा असे'.





# सोळाव्या शतकातले काही कवी

## मुक्तेश्वर

पंधराव्या शतकात दासोपंतांनी लक्षावधी पदे आणि कोट्यवधी ओव्या लिहून ठेवल्यामुळे सोळाव्या शतकातल्या कवींची आफत झाली. प्रकाशक आपले सारखे काही तरी आगळे लिहून द्या तरच छापतो म्हणावयाचे. नाही म्हटले तरी मुकुंदराजाच्या विवेकसिंधूपासून, मधले नामदेव आणि मंडळीचे काही कोटी अभंग, दासोपंत वगैरेंची घाऊक रचना, हे पाचसात शतकांतले प्रचंड उत्पादन पाहिल्यावर, सोळाव्या शतकातल्या मुक्तेश्वर वगैरे मंडळींचे धाबे दणाणले होते. पण ही माणसे कच खाणारी नव्हती. अन्नमंत्र्यांच्या हातात धान्यवाटप नसल्यामुळे माणसे कच न खाता चांगला निवडलेला गहू-तांदूळ खात. ज्ञानेश्वरांनी एका रेड्यालाच तेवढा वेद शिकविला होता. त्यामुळे म्हशी भलताच भाव खात नव्हत्या. दूधबीध नीट देत. डाल्डाचा जमाना नव्हता. शुद्ध तूप. शिवाय मुसलमानी अंमल येऊनही दोनशे वर्षे झाली होती. त्यामुळे मुली पळवणे किंवा बाटवणे वगैरे कार्यक्रम तितके जोरात नव्हते. धरणाबिरणांच्या योजना नसल्यामुळे पाणी मुबलक होते. गाडीत शिरण्यापूर्वी आतले उतारू व आत येऊ पाहणारे उतारू यांची खडाजंगी होते. ते एकदा गर्दीत घुसले आणि गाडी चालू झाली की लोणंद वगैरे येईपर्यंत माणसे जमवून एकमेकांना जागा करून देतात. त्याप्रमाणे हिंदु-मुसलमान, भटजी-मौलवी वगैरे लोकांनी जमवून घेतले होते. पण खरी अडचण दासोपंतांनी सगळे काही आधीच लिहिल्यामुळे झाली होती. त्यांचे ते वाचून काढीकाढीपर्यंत सोळावे शतक निम्मे उलटले. मग मुक्तेश्वरनामक कवीने एके दिवशी शाई आणि कागद मागवला. "एक एक अक्षराची भीक। जीर्ण कवींतें मागोनी देख" असे

म्हणत जरी तो आला, तरी सुरवातीला त्याने आधुनिक लेखकाप्रमाणे जे लिहिले आहे ते मराठी साहित्यपरिषदेच्या अश्लीलताविरोधी समितीच्या तीन पिढ्यांना काम पुरेल इतके आहे. महाराष्ट्र सारस्वतकारांचे मत तर, "हे राजश्री काशींत अभ्यास करण्याऐवजीं दुसरे कांहीं ढंग करीत असावेत असें वाटतें" असे आहे. शंकर पाटलांच्या 'वेणा' संपल्यावर बी० ए०ला फक्त मुक्तेश्वरच लावण्याचा कट चालला आहे असे आम्ही ऐकतो. तरी



"दररोज स्नानसमयी गंगाघाटावर जाऊन टिंगलटवाळीत वेळ घालवायचा न् पाठशाळेला उशीर करायचा ! पुढं काय दिवे लावणार आहात ?..."

(मुक्तेश्वरांच्या काशीमधील विद्यार्जनकाळातील त्यांच्या गुरूबरोबरचे एक दुर्मिळ छायाचित्र)

साहित्यपरिषदेचे अश्लीलता-समिति-सदस्य इकडे लक्ष देतील काय? मुक्तेश्वराचा दुष्यंत परक्याच्या घरी जाऊन त्याच्या सुंदर, अव्याज, साध्याभोळ्या, धड पातळ सावरता न येणाऱ्या आणि कुणाचा भुंगा मागे लागला आहे हे न कळणाऱ्या शकुंतलेपाशी जे बोलतो ते वाचल्यावर

'वासूनाक्या'वरची फोमण-पोक्या वगैरे गँग आधी स्काउटमध्ये असून नंतर राष्ट्रीय स्वयंसेवक संघाच्या शाखेखेरीज इतर कुठेही गेली नसावी इतकी सोज्ज्वळ वाटते. "हे संसारिक जना। सुप्रिय विषयाची वासना॥" वगैरे लिहिणारा मुक्तेश्वर आज जिवंत असता तर आचार्य प्रल्हाद केशव अत्रे 'मराठ्या'च्या स्तंभी गुरगुरले असते आणि त्याचे नाक कापले असते. ('महाराष्ट्राचा हरामखोर फुक्टेश्वर', लेखांक पहिला.) सोळाव्या शतकात होता म्हणून सुटला. पण एकदा अशी सनसनाटी केल्यावर प्रकाशकांचे त्याच्याकडे लक्ष गेले. प्रभाकर पाध्यांनी इतके सखोल वगैरे लिहून शेवटी लोकांचे लक्ष भाऊ पाध्यांकडे गेलेच की नाही?[1]

## मुक्तेश्वर बदलले

मुक्तेश्वराने आपल्या कवितांना एकदाचा प्रकाशक मिळविला. मग निषेधाच्या सभा वगैरे झाल्या. म्हणून मग त्याने प्रथम आरत्या व नंतर रामायण लिहिले. "हाती घेतलेलें रामायण पल्लवास पोचविल्यावर पुनश्च तो या भिकार भानगडींत पडला नाहीं" असे महाराष्ट्र सारस्वतकारांनी दोनशे अठ्ठावन्नाव्या पानावर स्पष्ट म्हटले आहे. वास्तविक मुक्तेश्वराने आपली वासू-शैली चालू ठेवावयाची. पण मग आपल्याला साहित्य-संमेलनाचे अध्यक्षपद मिळणार नाही म्हणून, किंवा आपण पॉप्युलर लेखक होऊ ('पॉप्युलर'चे नव्हे. हा भेद नेहमी ध्यानात घ्यावा.) ही भीती त्याला वाटली असावी. मुक्तेश्वराने रामायण वगैरे लिहिण्याऐवजी आपला जो बाज होता तो ठेवूनच लिहायला हवे होते. त्याचे रामायण, महाभारत वगैरे स्वस्त पुस्तक योजनेतदेखील कोणी घेईना. हे म्हणजे बाबुराव अर्नाळकरांनी 'रहस्यकथा' लिहावयाचे थांबवून 'गीतारहस्या'ची तळटिपांसह संशोधित आवृत्ती काढून 'प्रसाद प्रकाशना'तर्फे प्रसिद्ध करण्यापैकी होते. किंवा पु० ल० देशपांड्यांनी उगीचच हेमिंग्वेचे भाषांतर करण्यापैकी! "त्यांचा हा पिंडच नव्हे," असे एका टीकालेखिकेचे मत बरोबर आहे. ज्याला त्याला आपला पिंड ठाऊक हवा. नाहीतर जिवंतपणी त्याच्या पिंडावर कावळेच काय पण चिमण्यासुद्धा टोच मारून जातात.

---

१. आता प्रभाकर पाध्ये आपली काही जुनी पुस्तके भाऊ पाध्ये या नावाने छापणार असल्याचे ऐकतो. त्यांची 'मैत्रीण' ही कादंबरी 'पणती' ह्या नावाने आणि 'तोकोनामा' 'तोकोनाका' म्हणून प्रसिद्ध होणार असल्याची चतुर्शिंगीच्या दिशेने वार्ता आली आहे. हे त्यांना हेन्री मिलरने एकदा त्यांच्याशी गप्पा मारता मारता सुचवले म्हणतात.

मुक्तेश्वराचे तसेच झाले. वास्तविक हा एकनाथांचा नातू. आजोबांच्या पुस्तकांच्या सटीप आवृत्त्या काढल्या असत्या तरी मजेत राहिला असता. तसे त्याला कुणीकुणी सुचवलेही होते म्हणतात. पण मुक्तेश्वर ऐकणाऱ्यांतला नसावा. स्वतःवर भलता खूष होता. (कोण नसतो म्हणा!!)

आता मुक्तेश्वरावर एवढे रागवूनही आणि द्रौपदीची वगैरे छेड काढणाऱ्या माणसाबद्दल तिरस्कार दाखवूनही 'महाराष्ट्र सारस्वत'कार शेवटी म्हणतात: "...ज्याला सहृदयता आहे तो रसिक कोणीहि न विनवितां न सांगतां, आग्रह न करतां मुक्तेश्वराचीं गोड आख्यानें पुन्हां पुन्हां वाचीत सुटतो..." म्हणजे मुक्तेश्वराची एवढी 'फिरकी' घेऊन त्याचा घोडा क्यांटरमधीच![२]

## फादर स्टीफन्स, फादर गास्पार इत्यादी वडील मंडळी

सोळाव्या शतकातले कवी एकनाथ, दासोपंत वगैरेंच्या ओव्या-आख्याने वाचण्यात गुंतलेले पाहून हळूच काही ख्रिस्ती पाद्री गोव्यात आले. ग्रंथांच्या आकारावरून मराठीत पुस्तकांना सेल बरा आहे असे त्यांना वाटले आणि फादर स्टीफन्स नावाच्या फादरने ख्रिस्तपुराण मराठीत लिहिले. फादर स्टीफन्सच्या ख्रिस्तपुराणाचा खरा हेतू गोवा हा महाराष्ट्राचा अविभाज्य घटक आहे हे सिद्ध करण्याचा होता. पण "'अविभाज्य घटक' म्हळ्यार कितें रे सायबा?" असे जो तो विचारू लागला. 'पुस्पामाजीं मोगरी – परिमळामाजीं कस्तुरी' वगैरे ऐकल्यावर "खैंचें कस्तुरें, फोंड्याचैं कीं म्हाड्डोळचैं गा शणैनो? आनी मॉग्रें म्हळ्यार म्हापश्याचँ व्हयहाँ?" असे सवाल आले. त्यामुळे ख्रिस्तपुराणाचा दाखला वाया गेला. शिवाय 'अविभाज्य घटक', कलापथके आणि मराठी साहित्य संमेलने यांमुळे फादर स्टीफन्सचे ख्रिस्तपुराण महादेवशास्त्री जोशी यांनी टोपणनावाने लिहिले आहे असा त्यांचा समज झाला. फादर स्टीफन्स मात्र चतुर होता. त्याने ख्रिस्तापेक्षाही मराठी भाषेची अधिक तारीफ करून फादरविषयी आदर निर्माण केला. ह्या ख्रिस्तपुराणाचे वैशिष्ट्य असे: ते मराठीत असल्यामुळे ज्या गोंयकार ख्रिस्तावांसाठी होते ते लोक ते पुराण वाचीत नाहीत. आणि मराठी लोक एकशे एकवीस ते एकशे पंचवीस ह्या पाच ओव्या वाचून, "भासांमधें मानू थोरू। मराठियेसी॥" इतके वाचल्या-

---

२. सालं 'वासुनाक्या'च्या बाबतीतसुद्धा डिवद्धो एमने एमच होतं. लेडीज पण वाचतात!

वर पुराण मिटतात. फादर स्टीफन्सनंतर संपूर्ण ख्रिस्तपुराण फक्त अ० का० प्रियोळकर यांनीच वाचले आहे असे आम्हांस खात्रीलायक कळते.

### फादर गास्पार द मायगेल

मराठी-कोंकणी वादाचे आपणच आद्य जनक किंवा 'ओरिजिनल फादर'[1] म्हणून बरेच लोक आपला अग्रहक्क सांगतात. पण तो मान भो मानेस्त फादर गास्पार द मायगेल ह्याचा आहे. गास्पार द मायगेल ह्या फादरला कोकणीचा फार अभिमान. त्या ताणात त्याने कोकणीचे व्याकरण लिहिले. त्यामुळे "अँ! हँ कितँ रेऽऽ" म्हणून बरेचसे गोयकार क्रिस्तांव परत हिंदू झाले. ते पाहून त्याचा वरिष्ठ फादर स्टीफन्स ह्याने गास्पार-बाबाची दाढी खेचली. इंग्रजीत व्याकरण शिकवतात हे ऐकून पळापळ सुरू झाली. व्याकरणामुळे झालेल्या ख्रिस्ती धर्माच्या नुकसानीची शिक्षा म्हणून फादर गास्पारला पुन्हा त्याच्या मदरकडे पाठवीन, अशी धमकी दिल्यावर फादर गास्पार द मायगेल शुद्धीवर आला आणि त्याने आपला इमिजिएट बॉस फादर स्टीफन्स ह्याच्या स्तुतिपर चौदा ओव्यांचे मराठी कवन लिहिले. हेड ऑफ द डिपार्टमेंट खूष झाले व नोकरी टिकली. त्या एकदम वरती असणाऱ्या फादरला खूष ठेवण्यापेक्षा आपल्या निकटवर्ती फादरला खूष ठेवण्यामुळे परलोकी काय होईल ते होवो पण इहलोकी कल्याण होते हे फादर गास्पार द मायगेलला कळले.

मग त्याने पोर्तुगीज इण्टू कोकणी शब्दकोश लिहिला. आकाशवाणीच्या कोकणी कार्यावळीत तोच वापरीत असत. ती सतराव्या शतकातली कोकणी असल्यामुळे फक्त पोर्तुगिजांना कळत असे. कारण रात्रीचे पावणेनऊ वाजले आणि 'ट्यॉंय् ट टिट्यां – ट्यॉंय् ट टिट्यां – ' हे संगीत वाजपी वाजवू लागले की लिस्बनला सालाझार वगैरे कोकणी इण्टु पोर्तुगीज कोश उघडून बसत. आणि जो कोणी खबरांची वित्रावळ करीत असे त्याच्या 'खबरो' ऐकीत. पण हे कोकणी गोयच्या क्रिस्तावांना व हिंदूंना कळत नसे. पोर्तुगीज गेल्यावर नवी कोकणी सुरू झाली. ती भो मानेस्त, पदां बरौपी, 'साळकां शिरी'[2] बाकीबाब यांनी आणि बाकी-च्यांनी केली. ही कोकणी मात्र मराठी लोकांनाच कळते. गोयकार क्रिस्तांव,

---

१. 'ओरिजिनल सिन' असल्यामुळे 'ओरिजिनल फादर' असावयास हरकत नसावी.

२. कोकणात पद्मश्रीला 'साळ्कां शिरी' म्हणतात आणि पद्मभूषण हिंदूला मिळाले तर 'साळीक भांगर' आणि क्रिस्तावाला मिळाले तर 'साळीक बस्त्यांव'.



**फादर गास्फार द मायगेल आणि त्याचा**
**इमिजिएट बॉस फादर स्टीफन्स**

हिंदू आणि पोर्तुगीज ह्या तिघांनाही कळत नाही. मिनिस्टर फॉर फॉरेन ॲफेअर्सचे भाषांतर 'भायेल्या भानगडीचो मंत्री', फूड मिनिस्टरला 'भूस मंत्री', फायनान्स मिनिस्टरला 'दुडवा मंत्री', लेखकाला 'बरौपी', प्रकाश-काला 'उजडौपी', टीकाकाराला 'फाफडून उडौपी' किंवा वैमानिकाला 'उडपी' वगैरे शब्द ऐकून आमच्या मित्राची, हा कार्यक्रम अश्लील असतो अशी समजूत झाली होती. पण कोकणीत, आजन्म अविवाहित राहण्याची प्रतिज्ञा करणाऱ्याला 'फादर' म्हणतात, त्यामुळे तिथे अश्लीलतेला जागाच उरत नाही, हे सांगून त्याला गप्प केले. शिवाय भोमानेस्त काण्यो बरौपी लक्षीमणराय सर्देसाय यांच्या कथा वाचवाचवाचून ह्या मराठी लोकांना 'वासूनाका' या पुस्तकात 'माका नाका गो' म्हणून नाक मुरडण्यासारखे काय वाटले ते गोमंतकात अजूनही कळ्ळे नाही. (कळ्ळें मूं?)

तर असा हा फादर गास्पार द मायगेल.



# सोळाव्या शतकातील आणखी काही कवी

**सोळाव्या शतकात आणखीही कवी झाले आणि गेले.[1]**

१. याहून हे प्रकर्ण अधिक लांबवता येत नाही. तरी क्षमा असावी. त्यात पाणी घालून लांबवण्याचे काम आम्ही भावी पुरवणीकारांवर सोपवीत आहो.

# संत तुकाराम

## तुकाराम : एक अयशस्वी वाणी

प्रभात फिल्म कंपनीमुळे हा सोळाव्या शतकातला कवी विसाव्या शतकात प्रसिद्धीला आला. हा देहूचा राहणारा. दिसावयाला विष्णुपंत पागनिसांसारखा होता. वास्तविक हा मुक्तेश्वराचा समकालीन. पण ह्याच्या वाङ्मयावर मुक्तेश्वराची अजिबात छाप नाही. त्या वेळीदेखील पुण्याच्या परिसरातले कवी मराठवाड्यातल्या कवींना मानीत नसत. शिवाय तुकारामाची शिवाजीमहाराजांशी ओळख होती. साहित्याच्या उत्तेजनार्थ म्हणून स्वतः शिवाजीमहाराज बक्षिसाची रक्कम घेऊन आले होते. परंतु रामदासांना पहिले बक्षीस व आपणास दुसरे म्हणून तुकारामाने "ते बक्षीस गटारात फेकून द्या" असे स्पष्ट शब्दांत सांगितले. शिवाजी-महाराज पुन्हा देहूच्या बाजूला फिरकू शकले नाहीत. तुकाराम हा धंद्याने वाणी होता. पण "सोनें आणि माती। आम्हां समान हे चित्तीं" अशी वृत्ती असल्यामुळे "शेरभर गहू द्या वाणीदादा" म्हटले की गिऱ्हाइकाच्या पिश-वीत शेरभर ज्वारी टाकावयाचा, आणि वर वेदान्त सांगावयाचा. म्हणून एका गिऱ्हाइकाने ह्याच्याबद्दल "जयाची वदे पूर्ण वेदान्त वाणी। म्हणावें कसें हो तयालागि वाणी?" असे वैतागाचे उद्गार काढले. लोकांनी दुसऱ्या वाण्यांकडे कार्डे रजिस्टर केली. मंबाजीबाबाच्या मठात घडाभर गोड्या तेलाऐवजी मोहरीचे तेल पाठविल्यामुळे मालीश करताना त्याच्या अंगाचा दाह झाला. असल्या गुणांमुळे धंदा बसला. गिऱ्हाइकी आटली. दुकानात पुड्या बांधावयाला रद्दी जमविलेली असे. त्यात चौदा-पंधरा-सोळाव्या शतकातील प्रमुख कवी सोडून 'आणखी काही कवी' ह्या सदरात

मोडणाऱ्या अनेक कवींची बाडे रद्दीत आली होती. ती चाळता चाळता तुकारामाने स्वतः अभंग रचावयाला सुरुवात केली. दुसऱ्यांची पुस्तके छापता छापता किंवा प्रकाशित करता करता काही लोक स्वतः लेखक होतात हा दाखला आजही पाहावयास मिळतो. तोच प्रकार! दुकानात माशा मारीत बसावे अशीही परिस्थिती नव्हती. गुळाच्या व्यापारी लोकांनी उधारी थांबविली. मग शेवटी रीतसर दिवाळे वाजले. "बरें झालें देवा निघालें दिवाळें" असे त्यानेच म्हटले आहे. त्यात त्याचे काय गेले? व्यापारी ठणाणा करीत गेले. त्यांतल्या काहींना दारिद्र्य आल्यामुळे वैराग्य आले आणि ते तुकारामाच्या भजनी मंडळीला जॉइन झाले.

हळूहळू तुकारामाचा कवी म्हणून लौकिक वाढू लागला. ठिकठिकाणची काव्यगायनाची आमंत्रणे येऊ लागली. वास्तविक मुक्तेश्वर, तुकाराम आणि रामदास ह्या तिघांनी मिळून 'ज्ञानेश्वर ते रामदास' हा कार्यक्रम केला असता तर हाउस फुल गेला असता. पण त्या काळात आजच्यासारखी त्रिकुटे नव्हती. शिवाय रामदासांची शिवाजीमहाराजांशी जरा अधिक ओळख असल्यामुळे ते नेहमी हिल स्टेशन्सवर राहत. ह्या दोघांचे काही मौलिक मतभेदही होते. तुकोबा "भिक्षापात्र अवलंबिणें। जळो जिणें लाजिरवाणें" म्हणावयाचे, तर रामदासांनी "ब्राह्मणांची मुख्य दीक्षा। मागितली पाहिजे भिक्षा। ॐ भवती ह्या पक्षा। रक्षिलें पाहिजे॥" असे भडभडा भडभडा म्हणून टाकले होते. म्हणजे दोघांचे पक्षनिष्ठ मतभेद होते. तुकारामबुवांना पंढरपूर थेसिस मान्य होता; रामदासांचा रामभक्तीमुळे नासिक प्रबंधावर भर!

### प्रपंचात फेल

तुकारामबुवांची बायको कजाग होती असे त्यांनीच लिहून ठेवले आहे. कसलाही उद्योगधंदा न करणाऱ्या कुठल्या नवऱ्याची बायको आणखी काय असावी अशी ह्याची अपेक्षा होती? बाकी तुकाराम आणि रामदास हे दोघेही प्रपंचात फेल गेलेले असले तरी एकाने "प्रपंच करावा नेटका" म्हटले आणि तुकोबांनी "जोडोनियां धन उत्तम वेव्हारें" म्हटले आहे. साहित्य आणि साहित्यिकाचे खाजगी जीवन ह्यांचा काडीमात्र संबंध नसतो हे यावरून सिद्ध होते. लढाईच्या दिवसांत 'शत्रूला रुधिराचे स्नान घालू' वगैरे मतलब असलेल्या कविता लिहिणारे कवी आमंत्रितांच्या उपस्थितीत कविता म्हणताना कसे लटलटत असतात ते आपण पाहतोच.




**संत तुकाराम — आणि अश्लीलतेच्या व्याख्येचा घोळ**

तुकारामबुवांनी अभंग लिहिल्यामुळे आर्या, श्लोक वगैरे लिहिणाऱ्या पंडितांना प्रकाशक मिळेना. त्यातून तुकारामाने साहित्यपरिषदेच्या काही विद्वानांची पर्वा न करता अश्लील शब्दही वापरले. वास्तविक 'जे आपल्या घरातल्या बायकामंडळीपुढे बोलावयास आपणांस संकोच वाटतो ते अश्लील' ही व्याख्या तुकारामांस मंजूर होती. पण त्यांची पत्नी जिजाई देहूच्या रस्त्यात स्वतः जे बोलत असे ते ऐकून म० सा० प०च्या अश्लीलता-समितीच्या एकदोन सदस्यांना तुकारामाचीच भजनी दिंडी लावून सरळ इंद्रायणीच्या वाळवंटातच न्यावे लागले असते! अश्लीलाअश्लीलांत फरक असतो. तुकारामबुवांचे अश्लील शब्द देहूच्या अनेकांना मिळमिळीत वाटत. "अश्लीलतेच्याही कक्षा हळूहळू रुंदावत आहेत," असा एक गोड आशावाद कुणीसा नुकताच व्यक्त केला आहे.

## तुकारामाचा जाहीर निषेध

गाढव-ब्रह्मचर्य-दृष्टान्त, 'भले त्यासि देऊ'मधील लंगोटीचा भौगोलिक संदर्भासह उल्लेख, विद्वत्तेची गऱ्हवार लक्षणे, इत्यादींमुळे तुकारामाची ही

नवकविता अश्लील ठरविण्याच्या खटपटीस लोक लागले. त्या वेळी पुण्यात म० सा० प० नसल्यामुळे वाघुलीच्या रामेश्वरशास्त्री वगैरे लोकांनी पुढाकार घेतला. पुण्यातल्या ओंकारेश्वरावरील निषेधाच्या सभेत एका पंडिताने तुकारामाचे हातपाय तोडावे[1] असेही सुचविले. शेवटी रामेश्वरशास्त्री ह्या एकसदस्य मंडळाने तुकारामाच्या वह्या इंद्रायणीत बुडवाव्या, असा निर्णय दिला. वह्या लाकडी पेटीत घालून बुडविल्यामुळे वर आल्या, की तो पाण्याने न खराब होणारा कागद होता, हे कळण्यास मार्ग नाही. पुण्यातल्या पानशेतच्या पुरात बऱ्याच प्रकाशकांचा कागद व पुस्तके अशीच बुडून काही दिवसांनी वर आल्याचा प्रवाद[2] आहे. वह्या बुडविल्याची बातमी सगळीकडे पसरली व त्यामुळे तुकारामबुवांच्या अभंगांना भलती मागणी आली. पुस्तकाला सरकारी बंदी आणण्याची खटपट करणे हा बुडत्या धंद्यातून तरून येण्याचा हमखास उपाय आहे, हा धडा तुकोबांमुळे अनेक प्रकाशकांना मिळाला. न खपणाऱ्या पुस्तकांवर 'हाणा-मारा-ठोका-जाळा' छाप टीका यावी यासाठी प्रकाशकांची फार धडपड असते असे ऐकतो.

पण तुकाराम लोकप्रिय झाला तरी सरकारी अनुदाने रामदासांच्या शिफारशीने मिळत होती. त्यामुळे आर्थिक परिस्थिती बेतास बात राहिली. शिवाय पैठणला मराठी प्राज्ञ, पंडित वगैरे परीक्षांना मुक्तेश्वरसुद्धा लावीत, पण तुकाराम लाविला नाही. त्याचे अभंग मुख्यतः देवळात किंवा वारीबिरीत गात. म्हणजे धर्मार्थ. त्यामुळे अभंगांची रॉयल्टी नाही. त्यांतले 'देवाचिये द्वारीं' किंवा 'आम्हीं जातों आमुच्या गांवा' हे ताटीपुढले अभंग म्हणून प्रसिद्ध आहेत. असल्या प्रसंगी रॉयल्टीचे पैसे मागणे दिसावयाला वाईट दिसे.

### 'आम्ही जातों आमुच्या गांवा'

तुकारामाला नेण्यासाठी वैकुंठाहून विमान आले होते. तुकारामाच्या कार्यक्रमाच्या जागा लोहगाव आणि देहू. प्रथम ते लोहगाव विमानतळावर

---

१. तुकारामाच्या पार्टीतली मंडळी शुक्रवार तालमीच्या दिशेने निघालेली ऐकल्यावर, आपण हातपाय तोडावे असे म्हटले नसून, 'तुकारामाचे पाय आधी ओढावे व मग हात जोडावे' एवढेच म्हटले, असा खुलासा करणारी दवंडी दुसऱ्या दिवशी पिटविली असे म्हणतात.

२. तेव्हा बुडाल्याची भूमका उठलेला कागद हळूच पाण्यातून वर येतो असा अगदी अलिकडलाही पुरावा सरकारच्या आयकरविभागाच्या कागदोपत्री आहे.

जाऊन नंतर देहूला आले म्हणतात. इंद्रायणीच्या काठी एअरस्ट्रिप नसूनसुद्धा लॅण्डिंग बरे झाले. (पाहा : 'तुका झालासे कळस', गेव्हारंगांतील तुकारामाचे वैकुंठारोहण.) महाराष्ट्रात उतरलेले हे पहिले विमान. ह्या 'वैकुंठ' विमानावरूनच पुढे साहेबाने आपले 'व्हायकाउंट'[३] विमान केले. दोन्ही तीरांवर लोक 'आम्हीं जातों आमुच्या गांवा' म्हणत होते. पण खरा गावाला गेला तुकाराम! रात्री साडेनऊ वाजता आकाशवाणीवरून तुकारामाच्या वैकुंठारोहणाचे ध्वनिचित्र सादर करण्यात आले. त्यात मुख्यमंत्र्यांनी, ''तुकारामाच्या वैकुंठाला जाण्यामुळे भारताचे आणि विशेषतः मराठी वाङ्मयाचे फार नुकसान झाले आहे'' असे उद्‌गार काढले होते. पण वाईट रेकॉर्डिंगमुळे खरखरच ऐकू आली. श्रोत्यांना तो विमानाचा साउंड-इफेक्ट वाटला. काही का होईना, पण ध्वनिचित्र झाले.

### तुकारामाची ओसरलेली लोकप्रियता

त्यानंतर मात्र रामदास ते रामजोशी ह्या पुढल्या दोन शतकांत तुकारामाची लोकप्रियता ओसरली. पुढे तो जेव्हा बी० ए०, एम० ए०ला लागला तेव्हा पुन्हा शोधाशोध सुरू झाली. तेवढ्यात 'प्रभात'चा तुकाराम आला आणि लोक आवलीच्या कामावर खूष झाले. तसा थोडासा हा कमनशिबीच. कारण लोक पुन्हा 'तुकाराम' वाचतील असे वाटले होते, पण लोकप्रियता गौरी आणि विष्णुपंत पागनिसांना मिळाली. आणि तुकाराम चित्रपटातला सगळ्यांत रेकॉर्डब्रेक भाव खाऊन गेला 'आधीं बीज एकलें' हा अभंग! पण तो तुकारामबुवांचा नसून कवींचे नाव होते शांताराम आठवले. म्हणून लोक तुकाराम विसरले.

### ग्यानबा-तुकाराम

तुकारामाला एकट्याला प्रसिद्धी मिळाली नसली तरी 'ग्यानबा-तुकाराम' ही जोडी मात्र पॉप्युलर आहे. पण जोडनावाची ही पॉप्युलॅरिटी 'शंकर-जयकिसन' किंवा 'लक्ष्मीकांत-प्यारेलाल' एखादे दिवशी खाऊन जातील अशी आम्हांला भीती आहे. कारण ज्ञानेश्वर आणि तुकाराम

---

३. व्हायकाउंटचा मूळ उच्चार वैकुंठ असा आहे. बायबलचा मूळ उच्चार बैबल आहे तसा. साहेब आयुचा उगीच ऐ करतो.

४. हा शब्द लिहावयाची साली आपली हिम्मत नाही. आयला आपण म० सा० प०च्या अश्लीलता-समितीला जाम टरकतो.

ह्यांना खरी पॉप्युलॅरिटी मिळाली ती चित्रपटांच्या क्षेत्रातच! देहू आणि आळंदीच्या क्षेत्रांत मिळाली फक्त समाधी! उगीच नाही बिचारा म्हणाला, "तुका झाला सांडा। विटंबिती पोरें **४॥"

अलीकडेच मि० दिलीप चित्रे यांना '...रा० रा० तुकाराम तर थोरच' असा दृष्टांत झाल्याचे कळते. आणि मि० अरुण कोलटकर यांनी अभंगांचे चक्क इंग्लिश भाषांतर करून अनब्रेकेबल पॉटरीसारखी अन्-ब्रेकेबल पोएट्री असू शकते हे साहेबाला दाखविले. साहेब भाषांतर वाचल्यावर पार फुटला म्हणतात. आता एकतर वैकुंठवासी तुकोबांना वह्या पाण्यातून वर आल्याचा पश्चात्ताप होईल किंवा एकदाचे इंग्लिश भाषांतर झाल्यामुळे कुठल्याही मराठी कवीला वाटते त्याप्रमाणे 'हाय्येस्ट वॉटरमार्क' गाठला याचेही समाधान होईल. कुणाचा शेवटला दीसू कसा गोड़ू व्हावा हे तिसऱ्याने ठरवू नये. तुका म्हणे स्वस्थ राहावें। जें जें होईल तें तें पाहावें॥





# रामदास समर्थ

रामनवमीचे दिवशी 'टळटळीत दुपारीं' रामाचा जन्म ज्या वेळी होतो त्या वेळी जन्म घेऊनसुद्धा ह्यांचे नाव रामचंद्र वगैरे ठेवावयाचे काही ह्यांचे तीर्थरूप सूर्याजीपंत ह्यांना सुचले नाही. नारायण हे आपले नाव त्यांना कधीच आवडले नाही. लग्नात नवरीमुलगी उखाण्यात हेच नाव घेणार हे लक्षात येऊन वेळीच सावधान होऊन भर मांडवातून पळाले. पण भर बोहोल्यावरून पळावयाला लागलेल्या नारायणामागून त्याला पकडण्यासाठी धावण्याच्या भानगडीत कोणीही पडले नाही. कारण जांब हायस्कूलच्या वार्षिक क्रीडामहोत्सवात पळण्याच्या शर्यतीत विद्यार्थी नारायण ठोसर याने सगळी बक्षिसे पटकाविली होती, हे त्यांना ठाऊक होते. "त्याचे नाव काढू नका! चांगला जिलबीचा बेत होता तो वाया घालवून पळाले कार्टे शिंचे!" असे म्हणत लोक परत गेले. आणि मांडवाबाहेर "काही अपरिहार्य कारणामुळे संध्याकाळचे रिसेप्शन रद्द करण्यात येत आहे" असा बोर्ड लावला. महाराष्ट्र सारस्वतकारांच्या मताने, नारायण बोहोल्यावरून पळाला ही गोष्ट खरी नाही. आम्हांला तर वाटते की 'मनाचे श्लोक' चिक्कार खपावयाला लागलेले न बघवल्यामुळे कुठल्यातरी कवीने ही गोष्ट उगीचच त्यांच्या नावावर खपवली. कारण लग्नांना समर्थांचा विरोध नव्हता. लग्नकार्य पार पडू देऊ नये असली समर्थांची विचारसरणी कधीही नव्हती. उलट, त्या वेळी कुणाच्याही घरचे कार्य निघाले की ते हौसेने मदत करीत, म्हणून लोक तेव्हापासून आजतागायत निमंत्रणपत्रिकेत 'कार्यसिद्धीस श्री समर्थ आहे' असे लिहीत आले आहेत. मात्र "लेकुरें उदंड झालीं तों ते लक्ष्मी निघोन गेली" असे त्यांचे स्वतःचे मत

होते. कुटुंबनियोजनाचे महत्त्व पटलेला हा पहिला संत. आणि 'बरें सत्य बोला' आणि एकदा बोललात की 'यथातथ्य चाला' असे त्यांनीच म्हटल्या-मुळे साहजिकच त्यांनी लग्नाचा विचार टाकला. स्थळ चांगले असल्यामुळे ह्यांनी विचार टाकला तरी लोक शब्द टाकावयाचे. म्हणून डोंगरात उंच 'स्थळी' राहावयाला लागले. मुलींच्याच काय कुणाच्याही बापाची तिथे पोहोचावयाची ताकद नव्हती!

## मानवतावादी नव्हते

रामदास संत असले तरी ते मानवतावादी नसल्यामुळे तत्कालीन मुसलमान राज्यकर्त्यांत जरा अप्रिय होते. किंबहुना मानवतावादी नसलेला माणूस कुठल्याच राज्यकर्त्यांना आवडत नाही; कारण त्याला राजकीय मानवतावाद कळत नाही. सत्याप्रमाणे मानवताही मानवेल तितकीच पाळावी हे रामदासस्वामींना कळत नसे. मुली पळविणारे आणि त्या पळविलेल्या मुली ह्या दोघांनाही 'एकचि साऊली वृक्ष दे' एवढी साधी गोष्ट समजण्यास ते असमर्थ होते. त्यामुळे "भेद ईश्वर करूनि गेला। त्याच्या बाचे नवचे मोडिला॥ मुखामध्यें घांस घातला। तो अपानीं[1] घालावा?॥" असले काहीतरी आडदांड लिहीत.

## शैली नाही

आधुनिक काळातील डॉ० केतकर, केशवसुत वगैरे मंडळींप्रमाणे समर्थांना भाषाशैली म्हणजे काय तेही कळत नव्हते. त्यामुळे आपले वाङ्मय खपविण्यासाठी केतकरांप्रमाणेच त्यांना गावोगावी खटपट करावी लागली. त्या विक्रीकेंद्रांना मठ असे नाव दिले. साहित्यिकांचे मठ काढण्याची कल्पना मात्र रामदासाची. केतकरांना हे सुचले नाही. आजही साहित्यात रामदासी मठ आहेत. रामदासांनी साहित्याप्रमाणे आखाडेही काढले. त्यामुळे त्यांच्या साहित्यावरची टीका बंद झाली. त्यांना 'गायनी कळा' येत होती. मात्र आपल्या घराण्याखेरीज इतर घराण्यांची गायकी गाणाऱ्यांना "उगीचि भुंकणें खोटें। गधडे भुंकती जसे॥" असे म्हटले आहे. ह्यावरून इतर काही सिद्ध झाले नाही तरी त्या काळी कुत्र्यांप्रमाणे गाढवेही भुंकत होती हे सिद्ध होते.

---

१. म० सा० प०ची अश्लीलता-आघाडी केवळ 'अपान' ह्या शब्दाला संस्कृत पार्श्वभूमी असल्यामुळेच समर्थांची गय करून सोडून देईल असा विश्वास आहे.

'मनाचे श्लोक' हे मनातल्या मनात न म्हणता जनात म्हणण्यासाठी त्यांनी लिहिले. त्यामुळे दासनवमीच्या उत्सवात पाठांतराच्या चढाओढीची सोय झाली.

**जादूचे अज्ञान**

त्या काळच्या साहित्यिकांचे जादू आल्याखेरीज मात्र भागत नसे. ज्ञानेश्वरांनी भिंत चालवून दाखविणे, मेलेला माणूस चितेवरून उठविणे (पाहा : 'निवृत्तिज्ञानदेव' चित्रपट), तसेच तुकारामाने वह्या पाण्यातून वर आणून दाखवणे अगर वैकुंठातील विमान देहूला आणवणे, असे अनेक चमत्कार केले. रामदासांना शक्तीचे प्रयोग येत असले तरी जादूच्या प्रयोगात त्यांची फारशी प्रगती झाली नाही.[२] एकदा छत्रपतींच्या पुढे त्यांनी फक्त दगडातून बेटकुळी काढून दाखविली असे सांगतात. पण आमच्या मते मूळ कागदपत्रांत 'दगडातून' नसून 'दंडातून' बेटकुळी दाखविली असे असेल. ह्या मोडी लिपीमुळे मराठ्यांच्या इतिहासात फार घोटाळे झाले आहेत. 'राज्य चालवावे' ह्याऐवजी 'राज्य घालवावे' असे वाचल्यामुळे स्वामिनिष्ठ मराठ्यांनी राज्य घालविले. शिवाय लिपीला विरामचिन्हांची शिस्त नसल्यामुळे सगळे शब्द बाजारबुणग्यांसारखे आपली वाक्ये सोडून दुसऱ्या वाक्यांत घुसावयाचे. म्हणून समर्थ मोडीच्या अगदी विरुद्ध होते. "ब्राह्मणें बाळबोध अक्षर। घडसून करावें सुंदर।" असे त्यांनी बजाविले आहे. दासबोधासाठी त्यांनी अठ्ठेचाळीस पाइंट पायका वापरावयाची ताकीद दिली होती. छत्रपतींनी समर्थांच्या टुणटुणीत तब्येतीवर काहीतरी विनोद केल्यावर त्यांनी "आम्हीं काय कुणाचें खातों रे, श्रीराम अम्हांला देतो" असे ऐकवून त्यांना आपल्या गोटीबाज दंडातली बेटकुळी दाखविली असणार. सरकारातून मानधन वगैरे घेत नसल्यामुळे ते शिवाजीलाही ठणकावू शकत. एकदा वेतन वगैरे घेतल्यावर प्रतिशिवाजीपुढेही तोंडाला फडके बांधणे येते. त्यातून समर्थांना विनोद अजिबात आवडत नसे. विनोदी साहित्याची त्यांना भयंकर चीड होती.

---

२. जादूच्या प्रयोगांची त्यांना आवड नसावी. कारण लग्नकार्य तडीस नेण्यास 'श्री समर्थ' आहेत त्याप्रमाणे जादूचे प्रयोग पार पाडण्यास 'रघुवीर समर्थ आहेत' असा तरी कागदोपत्री उल्लेख आला असता. रामदास समर्थांचे रघुवीर समर्थ केव्हा झाले ह्याविषयी मात्र कुठेच माहिती नाही. नारायणाचा रामदास समर्थ आणि त्याचा रघुवीर समर्थ एवढी नावापुरती जादू सोडल्यास समर्थांना दुसरी जादू जमली नाही.




**रामदासांचा बाणेदारपणा**
मानधन घेत नसल्यामुळे परवडला.

"विनोद करी सर्वदा। तो येक मूर्ख" असे त्यांनी स्पष्ट म्हटले आहे. आम्हांला समर्थांविषयी ह्या एका कारणामुळे अतिशय आदर आहे. आम्हांलाही समर्थांप्रमाणेच इतरांनी केलेला विनोद आवडत नाही.

## दासबोध

'दासबोध' हा समर्थांचा फार प्रसिद्ध ग्रंथ. व्याख्यानाच्या पूर्वतयारीला ह्या ग्रंथासारखा ग्रंथ नाही. 'यत्न तो देव जाणावा', 'सामर्थ्य आहे चळवळीचें', 'धटासी असावें धट', असे खूप तुकडे श्रोत्यांवर फेकण्यासाठी मिळण्याची इथे सोय आहे. ह्या ग्रंथाचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे इतर लेखक समासाची जागा कोरी सोडतात; दासबोधात समास लिहून बाकीची जागा कोरी सोडली आहे. म्हणून दासबोधातील समास म्हणजे लिहिलेला भाग. पुष्कळ लोक दासबोध वाचून कोरे राहतात ह्याचे हेही कारण असेल.

दासबोधातली पहिली नमने संपल्यावर ग्रंथाला सुरुवातच मुळी मूर्खांच्या लक्षणांपासून आहे. ती वाचणाऱ्या प्रत्येकाला 'तो मी नव्हेच',

किंवा ही लक्षणे इतरांना लागू आहेत, असे वाटते. हे मूर्खांच्या लक्षणांचे व्यवच्छेदक लक्षण आहे. त्यांतली "आपली आपण करी स्तुती" त्याला हल्ली मूर्ख न म्हणता नेता किंवा निवडणुकीचा उमेदवार म्हणतात.

कार्ल मार्क्सने आपला 'दास कापिताल' हा ग्रंथ दासबोधावरून घेतला. कारण शिवाजीमहाराजांनी मावळ तालुक्यात शेतकऱ्यांची संघटना करून क्रांती करण्याची स्फूर्ती ह्या ग्रंथाने मिळवली असे त्याला कळले होते. शिवाजीमहाराजांना हिरवे निशाण उडवून वास्तविक लाल झेंडा लावावयाचा होता. पण त्यातल्या त्यात तडजोड म्हणून शेवटी भगवा झेंडा ठरला. समर्थांनी ही तडजोड काढिल्यामुळे शिवाजीमहाराजांबद्दल महाराष्ट्रात हिंदुमहासभावादी भालजी आणि मार्क्सवादी लालजी ह्या दोघांचाही आदर टिकून राहिला. भालजींनी 'भगवा झेंडा' आणि 'छत्रपती शिवाजी' असे दोघांवरही चित्रपट काढले आणि लालजी पेंडशांनी एक लालभडक पुस्तक लिहून शिवाजीच्या हाती भवानी तलवारीबरोबर विळाकोयताही दिला. दासबोधातली मूर्खांची लक्षणे अभ्यास करण्यासारखी आहेत. (प्रिय कंपोझिटर, ह्या वाक्याला प्यारा बदला, नाहीतर भलता घोळ होईल. थँक्यू.)

बाकी समर्थांनी त्यांना स्वतःलाही कल्पना नव्हती अशा अनेक गोष्टी केल्या ह्यात शंका नाही. समर्थांच्या घरच्या श्वानाला सर्व जण मान देत असत. महाराष्ट्राने ती परंपरा अत्यंत आत्मीयतेने जतन करून ठेवली आहे. जयजय रघुवीर समर्थ॥




**महाराष्ट्राने अत्यंत आत्मीयतेने जतन करून ठेवलेली परंपरा.**

समर्थांच्या नकळत





# पंतकवी

रामदासस्वामींनी "धिर्धरा धिर्धरा तक्वा हडबडूं गडबडूं नका" वगैरे दांडगाई करून काव्याच्या मुलखात पुंडावा केला. ह्याच काळात शिवाजीमहाराजांनी स्वराज्य वगैरे स्थापन केले. काही किल्ले घेतले, काही सोडले. आग्र्याहून पळून वगैरे आले. काही लढाया केल्या. अफझुलखान वगैरेंना मारले. परंतु हे सगळे विषय बहुजनसमाजाचे असल्यामुळे पोवाडेवाल्यांना गणेशोत्सवातल्या कार्यक्रमांसाठी सोडून अस्सल कवी महाभारत, रामायण ह्यांतल्या लढायांतच रमले होते. वामनपंडित हे त्यांतले अग्रगण्य कवी. "तुकाराम-रामदासादि साधूंचा उपदेश घेण्याचें त्यानें योजिलें. पण तेंहि नीट जमलें नाहीं." असे महाराष्ट्र सारस्वतकार म्हणतात. म्हणजे रामदास-तुकारामादींना जमले नाही की वामनपंडितांना हे कळत नाही. पण वामनपंडितांची दोन्ही पक्षनेत्यांशी बोलणी फिसकटली हे निश्चित. वामनपंडितांचा आपल्या हाताने कविता आणि स्वैपाक करावयाचा परिपाठ होता. बायकोच्या हातचे त्यांना चालत नसे. घरात गिराबाईंची चूल निराळी असे. त्यामुळे 'रांधा वाढा उष्टी काढा' ही तक्रार गिराबाईंनी कधीही केली नाही. एकदा वामनपंडित पाकसिद्धी करीत असताना त्यांच्या पेटत्या चुलीपुढे त्यांना एका यतीचे दर्शन झाले आणि त्यांनी वामनपंडितांना 'भार्गवी वारुणी' विद्या पढवली. ह्या विद्येचा पुढे लोप झालेला दिसतो.

वामनपंडित, मोरोपंत वगैरेंना पंतकवी म्हणतात. एकनाथांनी अस्सल दुधाचा मेवा केल्यानंतर रामदास, तुकाराम वगैरे मंडळींनी तसला काही पदार्थ केला नाही. ते दुग्धभांडार बंदच पडले होते. पण वामनपंडिताने तो



**डेअरिंगबाज दुग्ध व मेवा भांडार**
**नवीन मॅनेजमेंटखाली. (आता) प्रोप्रायटर : वामनपंडित**
**रेनोव्हेशन चालू आहे.**

पाककुशल असल्यामुळे पुन्हा कढई साफ केली. याविषयीचा महाराष्ट्र सारस्वतकारांचा अभिप्राय अतिशय रुचकर आहे: "कविताधेनूच्या गोड गोरसांत केव्हां भक्तिरसाचा तर केव्हां वत्सलरसाचा, केव्हां करुणशृंगाराचा तर केव्हां अद्‌भुतरसाचा उत्कृष्ट मिलाफ करून त्यांतच वेदांताचा मसाला टाकून उत्तम मिठाई बनवून ती आपणांस नित्य चाखविणारा हा त्या व्रजवासी गोपाळाचा हलवाईच आहे, असें मनांत येतें." (म० सा०, पृष्ठ ३६३.)

वंशीं नादनटी तिला कटितटीं खोवोनि पोटीं पटीं।
कक्षे वामपुटी स्वशृंग निकटी वेताटिही गोमटी॥

वगैरे नमुने पाहिल्यावर अधूनमधून ह्या ब्रजवासी मिष्टान्नभांडारात कडक बुंदी वगैरे कवळी-तोड मालही बनवीत असत असे दिसते.

वामनपंडितांचे हरि, साम्राज्य वामन, बापू वामन, विश्वनाथ, नरहरी, विठ्ठल, नागेश वगैरे शिष्य होते. त्यांच्याकडे यमके गोळा करण्याचे काम असे. एकदा 'कंदमुळे' असा शब्द धरला की मग हरि किंवा साम्राज्य वामन जळे, ओवळे, अमळे, बळे, सोवळे, धवळे, पिवळे, व्याकुळे, पादतळे, हळहळे, देवागळे वगैरे शब्द टोचून ठेवीत. फायनल फिटिंग अर्थातच वामनपंडित स्वतः करीत.

वामनपंडितांनी 'यथार्थदीपिका' नावाचा गीतेवर टीकाग्रंथ लिहिला. त्यात टीकेचा मुख्य रोख ज्ञानेश्वरावर आहे. ''जगीं मिरवोनी सिद्धी। आपुल्या टीकेची केली प्रसिद्धी। तथापि नाही झाली अर्थसिद्धी। यथार्थ गीतारहस्याची॥'' असे म्हणून ज्ञानेश्वर हे पब्लिसिटीच्या मागे कसे लागले होते ते त्यांनी लिहिले आहे. ''गीता जाते पश्चिमेकडे। टीका चढे पूर्वदिशा पर्वताचे कडे।'' वगैरे शब्दयोजनेवरून मराठीतील टीकापरंपरेचा मागोवा[1] घेत गेले पाहिजे. यथार्थदीपिकेतील ही टीका वाचल्यानंतर 'भार्गवी वारुणी' किती कडक असेल ते कळते. हे काही असले तरी वामनपंडित, मोरोपंत इत्यादी पंतकवींमुळे कीर्तनकारांची उत्तम सोय झाली. आणि अर्थातच पाठ्यपुस्तकांतल्या पद्यविभागाच्या उताऱ्यांची. परंतु मुख्य सोय पंगतीत श्लोक म्हणणाऱ्यांची झाली. ''नसे ठावा ब्रह्मा'' किंवा ''माळाकार परस्परें कर गळां'' वगैरे श्लोकांच्या फैरी पंतकवी नसते तर झडल्या नसत्या. जिलब्यांची एक चवड रिचविल्यानंतर ह्या श्लोकामुळे उसंत मिळून पंगत पुढल्या चवडीसाठी सिद्ध होत असे. आपल्या सहस्रा-वधी श्लोकांनी ब्राह्मणभोजनांच्या पंक्तीत चैतन्य आणणारे हे पंडित कवी खरे तर पंगत कवीच आहेत. सध्या पंक्तीच उठत नसल्यामुळे पंत-काव्याचा ऱ्हास झाला. ही स्थिती शोचनीय आहे.

## देवदास, शिवराम, जयराम, पंडित वगैरे कवी

हे कवी वामनपंडितांच्या वाड्यात त्यांच्या मागून राहावयाला आले असावे आणि पोटमाळे, कणग्या वगैरे साफ करता करता वामनपंडित आणि मंडळींनी जमविलेले यमकांचे गट्ठे हाती लागले असावे. ह्यांतल्या पंडित नावाच्या कवीला तर फडताळात चुकून राहिलेला यमकांचा

---

१. मागोवा : जो घेतल्याखेरीज समीक्षेचा कैफ चढत नाही असे एक द्रव्य.



**कामात वामनपंडित**
**त्या दिवशी गोळा केलेली यमके धरून उभे.**

गठ्ठाच्या गठ्ठाच हाती लागला असणार. कारण त्याच्या कवितेतली एक ओळ अशी आहे: "हंसा मुंगसा वासा तरसा रिसा फणसा सिरसा सारसा सरसा अनारसा।" (पाहा: महाराष्ट्र सारस्वत, पृष्ठ २९३.) वामनपंडितांच्या कुठल्यातरी हरि किंवा साम्राज्य वामन वगैरे शिष्याने सकाळीच 'सा' धरून पसापसा शब्द गोळा केलेले ह्याला आयते सापडले. वामनपंडितांची बरीच बाडे विसरून राहिली आहेत ही बातमी फुटल्यावर अनेक होतकरू मंडळींनी रेडिमेड अनुप्रास आणि यमकांसाठी तिथे गर्दी केलेली दिसते. कारण एका रामदासी कवीनेसुद्धा,

कोकिळा त्या किळा वीकळा हो कळा।
मोकळा मोकळा तो कळा हृत्कळा॥

गुल्गुला बुल्बुला गल्बला माजला।
रोळला घोळला वोळला मेहुला॥

अशी माळ घातली आहे. समर्थ जिवंत असते तर एका कुबडीत ह्या शिष्याला जन्माचा कुबडा करून ठेवला असता ही गोष्ट निराळी!

ह्या काळातल्या कवींची परिस्थिती मात्र बरी असावी. गंगाधर कोकिळ नावाच्या कवीने लिहिलेली एक ओळ फारच बोलकी आहे: "ठेविल भगवान तैसेंचि राहणें। तूपसाखर पोळी खीरभात खाणें।" कवींना ठेवणारे असले भगवानशेठसारखे लोक पाहिजेत. ह्या कालखंडात एकच बालगीत लिहिले गेले, त्यामुळे बालके मजेत होती. शिवराम नावाच्या कवीने ते लिहिले आहे:

> गुरुवाक्याचें निजशेष चाखाया।
> मांजर आजि होउं॥ ध्रु०॥
> मी येउं। मी येउं। मी येउं॥
> मांजर आजि होउं॥ म्याऊं॥ म्याऊं॥ म्याऊं॥

हे मांजर आडवे आल्यामुळे की काय कोण जाणे, काव्य पुढेच गेले नाही. सगळे कवी आपले शब्दच चाटीत बसले.

## मोरोपंत

> नित्य तुम्हीं प्रभुपार्शी पेढेबरफी नवा खवा खावा।
> तरि म्यां एके दिवशीं रेवडिचा स्वाद कां न चाखावा॥

एकनाथ किंवा वामनपंडित ह्यांनी दूध व दुधाचे पदार्थ हे धोरण ठेवल्यामुळे नंतरच्या कवींना आजचा ताजा पदार्थ काय करावा असा नेहमी प्रश्न पडत असे. मोरोपंतांनी त्यातून रेवडीचा तोडगा काढला. त्यांनी 'आर्या आर्यासि रुचे' हे ओळखले. इतर छंदांतही गोडी आहे, पण आर्या ती आर्या, असे त्यांचे स्पष्ट मत होते. मात्र आर्यावृत्तातल्या त्यांच्या रेवड्या नेहमीच चांगल्या जमत नसत. 'प्रल्हादविजय' ग्रंथात त्यांनी हा रेवडीचा स्वाद आणण्याचा प्रयत्न केला. पण महाराष्ट्र सारस्वतकारांच्या मते "ही पाकनिष्पत्ति नीट उतरली नाहीं." त्यांच्या मते "कितीहि गोड बनविलें तरी अवजड आर्यावृत्त कटु तें कटुच." पण मोरोपंतांची 'आर्या' आणि छंदःशास्त्रगुरू जिला 'आर्या' मानतात ती, ह्यांच्यात काहीतरी घोटाळा झाला आहे. दुसरी आर्या सुलभ आहे. पंत तिला आर्या म्हणतात. आर्येचे दोन प्रकार असतात: अवजड आर्या आणि सुटसुटीत आर्या.

अवजड आर्येकडून पाकनिष्पत्ती चांगली बनत नसावी असे दिसते.

पुढे मोरोपंतांनी निरनिराळ्या प्रकारची पाकनिष्पत्ती करावयास सुरुवात केली. बाबा पाध्ये यांच्या सांगण्यावरून 'कृष्णविजय' हा ग्रंथ रचिला. "ह्याचा पूर्वार्ध नारिकेलपाक" आहे असे महाराष्ट्र सारस्वतकार म्हणतात. पण "बाबा पाध्यांना देखील तो पचायला जरा जड वाटला." नारळाच्या वड्या घाटावरच्या लोकांना लवकर पचत नाहीत. मग उत्तरार्ध लिहिताना मोरोपंतांनी पाध्यांची पचनशक्ती ध्यानात घेऊन आपले काम केले. उत्तरार्ध म्हणजे म० सा० कारांच्या भाषेत "कपिला गाईचें दूध आहे." ह्या दुधावर बाबा पाध्यांना ठेविल्यामुळे त्यांचे अपचन बरे झाले. ह्या प्रसंगाचे वर्णन चंपूकार[२] करतात:



**अवजड आर्येकडून पाकनिष्पत्ती चांगली बनत नसावी असे दिसते.**

---

२. हे चंपूकार कोण आम्हांसही ठाऊक नाही. लहानपणी कीर्तनकारांच्या तोंडून ह्यांचे नाव आम्ही नेहमी ऐकत होतो.

गर्जत गागत आले पाध्ये दारीं मयूरपंताच्या।
संतापें आदळल्या पोथ्या मग कृष्णविजय ग्रंथाच्या॥
म्हणती "जठर बिघडलें तुमच्या त्या नारिकेलपाकानें"।
धाकानें डरला कवि पाजी मग दुग्ध त्यासि टाकानें॥

इथून पुढे पंतांचे आणि प्रकाशकांचे संबंध सुधारले. नंतर पंत पन्हाळ्याहून बारामतीला आले. आणि महाभारत आणि एकशे आठ रामायणे लिहिली. महाभारताची पद्यसंख्या १७१३६ येते. फावल्या वेळात मग एक-एक रामायण लिहून काढीत असत. मोरोपंत कवितेच्या बाबतीत संपूर्ण स्वावलंबी होते. आपली यमके, प्रास वगैरे आपण स्वतः जमवून नीट टोचून ठेवीत. त्यांनी सगळ्या आर्यांची शेवटली अक्षरे आधी लिहून ठेवली असावी. म्हणजे 'काकांनी' हे आधी लिहून मग, कलकलाट, केला, मग, नेली, मुक्ता, हंसें, असे उर्दू पद्धतीने लिहीत जात असावे. त्यांच्या १०८ रामायणांपैकी 'हुं रामायण' असे प्रसिद्ध रामायण आहे. "नीट शोध केला असता हें रामायण सापडेल." असे महाराष्ट्र सारस्वतकारांचे मत आहे. आमचेही तसेच मत आहे. मोरोपंतांनी एकशे आठ रामायणे लिहिल्यानंतर रामायणात लिहिण्यासारखे काही उरणार नाही अशी त्यांची समजूत होती. परंतु वाल्मिकी मुनी ते वि० म० कुलकर्णींपर्यंत दरवर्षी नवे रामायण तयार होत आहे. या क्षणी महाराष्ट्रात गीतरामा-

कखग घङम टठडढण वर्णमाला | कख गघ ङमट ठडढण वर्ण माळा ||
क खग घङमटठ डढण व र्णमाला | क खगघङ मटठ डढणव र्णमाला ||१||
कखगघ ङम टठडढणव र्णमाळा | क ख ग घङम ट ठड ढणवर्ण माळा ||
कखगघ ङमटठ डढ णवर्णमाला | कखगघङम टठडढण वर्णमाळा ||२||

**मोरोपंतांचे हस्ताक्षर**

**(एक दुर्मिळ अप्रकाशित आर्या)**

यणाप्रमाणे भावगीतरामायण, लोकगीतरामायण, गझलरामायण, अशी आणखी एकशे आठ रामायणे अहिल्येसारखी प्रकाशकाच्या पदस्पर्शाची आणि रेडियोवरील संगीतदिग्दर्शकांच्या चरणचालींची वाट पाहत पडली आहेत असे ऐकतो. खरेखोटे राम जाणे.

पंतांची दिनचर्या काय होती याविषयी फारशी माहिती उपलब्ध नाही. परंतु पहाटे साडेचार वाजता उठून प्रातःकर्मे झाल्यावर ते उद्योगाला लागत असावेत. दुपारच्या भोजनापर्यंत शब्द नीट धरून अक्षरे सोडवून घ्याव-याचे आणि मग 'वदविला साचा'च्या जोडीला 'पदविलासाचा', 'वायसा-राती'च्या जोडीला 'काय सारा ती', 'पद रमला' आणि 'पदर मला', 'न नाथ सा मान्य' आणि 'अनाथ सामान्य' अशा जुड्या बांधून ठेवून द्यावयाचे. अशा चारपाचशे जुड्या झाल्या की त्यांचे सॉर्टिंग करून एकशे आठ रामायणांपैकी कुठल्या रामायणात कुठली बसते ते पाह्यवयाचे. ('वाहतो ही आर्यांची जुडी' असे एक नाटकही ते लिहिणार होते. "वस्तूंत जसें हाटक काव्यीं नाटक..." अशी जुडी जमली होती. पुढे इतरां छंदीं जाण्यापेक्षा त्यांना आर्याच बरी असे वाटले असावे.) दुपारच्या भोजना-नंतर तासभर विश्रांती घेत. विश्रांतीच्या वेळी करमणुकीसाठी ओव्या, भुजंगप्रयात, वसंततिलका वगैरे छंदांत आख्याने, वगैरे पडल्या पडल्या लिहून काढीत. विश्रांती झाली की पुन्हा सकाळच्या यमकांच्या जुड्या उलगडून आर्या पुऱ्या करीत. संध्याकाळी पुराण सांगून झाले की जरा फिरून येत. तिथेही करमणूक म्हणून श्लोक वगैरे रचीत. पुढेपुढे दुकान-दारांशी वगैरेसुद्धा ते आर्येतच बोलत. क्वचित प्रसंगी दुसऱ्याने उच्चार-लेल्या शब्दाचा अर्थ समजण्यात घोटाळा होई. भाजीवालीला टोपलीत काय आहे हे विचारल्यावर ती "भोपळा" म्हणाली आणि पंतांना वाटले, "भो पळा" असे ती फणकाऱ्याने म्हणाली, म्हणून पळू लागले. शेवटी घरी आल्यावर भोपळ्याची फोड चुकली हे त्यांच्या ध्यानी आले.[३] एकशे आठ रामायणे, अनेक महाभारते, भागवताचा दशमस्कंध, शिवाय शंभरसवाशे फुटकळ आख्याने, इतके रचावयाला गेला बाजार शब्दांच्या सहस्र कोटी जुड्या बांधाव्या लागल्यामुळे त्यांच्या कानी शब्द आला की त्याचे यमक उभे राही. "कसे काय पंत?" म्हटले की "बरे आहे" म्हणण्याऐवजी संत, खंत, दंत, हंत, असे काहीतरी सुरू व्हावयाचे. मग पोरीबाळी, "पंतकाका, आम्हांला गाणे, आम्हांला गाणे" करून मागे लागत. त्यांच्यासाठी

---

३. अशी एक आख्यायिका आहे.

येताजाता, झोपाळ्यावर वगैरे म्हणावयाला गाणी करून देत. झोपण्यापूर्वी एक हजारबाराशे आर्या करून नंतर झोपत.

आजही बारामतीस, त्यांच्या लक्षावधी आर्यांपैकी एकीचाही फारसा कुणाला पत्ता नसला तरी त्यांचे राहते घर दाखवितात. मात्र "बारामती कशाबद्दल प्रसिद्ध आहे?" ह्या प्रश्नाचे उत्तर "सहकारी साखरकारखान्यांबद्दल" असे लिहिले तरच मार्क मिळतात, हे लक्षात ठेवावे.



# शाहीर

मराठी साहित्याच्या इतिहासात शाहिरांचे आणि लावणीकारांचे स्थान अजोड आहे.[१] सार्वजनिक गणेशोत्सव आणि ग्रामीण चित्रपट नसूनही हे शाहीर आणि लावणीकार कशाच्या जिवावर जगत होते ते समजत नाही. युद्धावरून येणाऱ्या सैनिकांसाठी यांचे कार्यक्रम होत असत, असे म्हण- तात. म्हणजे संरक्षणनिधीसाठी होत असणार. म्हणजे फुकट. फार तर मुख्य कलावंतांना श्रीफळ आणि शालजोडी. ह्या शाहिरांपैकी रामजोशी, अनंतफंदी वगैरे सगळे जण ज्या अर्थी लाइन सोडून कीर्तनात गेले, त्याअर्थी धंद्यात राम राहिला नसावा.

## रामजोशी

संत तुकारामांप्रमाणेच शाहीर रामजोशी यांना सिनेमामुळे बरेच नाव मिळाले. इंटर्व्हलपूर्वी राम व नंतर जोशी अशी विभागणी केल्यामुळे पब्लिक आणि प्रेक्षक दोघेही खूष. रामजोशी सोलापूरचे राहणारे. त्यांना सिनेमात शांताराम यांनी आणले, पण आधी तमाशात कोणी आणले कल्पना नाही. त्यानंतर सोलापूरच्या रा० ना० पवारांनी नाटकात आणले. त्यांचे वडील भाऊ मुद्‌गलशास्त्री. (रामजोशांचे, पवारांचे नव्हे.) त्यांना धाकट्या भावाने तमाशात जाणे पसंत नव्हते. पण रामजोशी ऐकेनात. सुरुवातीला धंदा बरा होता. पुढे मग "अंबरगत परि पयोधरातें रगडुनि

---

१. हे वाक्य आम्हांला संतांबद्दल लिहावयाचे होते ते राहून गेले. पंतकवींच्या वेळीही विसरलो. आता शाहीर आणि लावणीकारांच्या नशिबात ते होते तेव्हा इथे आले. साहित्यात तसे पाहिले तर सगळ्यांचेच स्थान अजोड. पत्रकार जसे सगळेच झुंजार, त्याप्रमाणे स्थान हे नेहमी अजोड.

पळतो दुरी'' वगैरे छेकापन्हुती करावयाला लागले. पब्लिकला कळेना. दुर्बोधता हे काव्याचे व्यवच्छेदक लक्षण आहे, वगैरे सांगूनही पैसे परत मागावयाला लागले. आयुष्यात तमाशा न पाहणाऱ्या सांगलीकर महा-राजांनी त्यांना सर्टिफिकिट दिले. कारण त्यांना हाय मराठी कळत होते. वामनपंडितांचे –

> पृथुनितंब नितंबिनिच्याविरी। कटितटीं करि सूत्रचि सावरी।
> घुसळितां[२] ...

हे वाचून त्यांचे मराठी सुधारले होते. पण पब्लिकमध्ये जवान, शेतकरी वगैरे बहुजनसमाज होता. प्रत्यक्ष कविवर्य मोरोपंतांनी ''नटाचे तोंड पाहणार नाही'' ही प्रतिज्ञा मोडून रामजोशीबाबांचा तमाशा पाहिला. 'नटीचे तोंड पाहणार नाही' अशी त्यांची प्रतिज्ञा होती की नाही याबद्दल पुरावा उपलब्ध नाही. रामजोशीबाबांच्या फडात बया आणि चिमा अशा अभिनेत्री होत्या. त्यांना पेशवेदरबारात सरकारी पुरस्कार आणि मान-चिन्हसुद्धा मिळाले होते. रामजोशीबाबांनी 'पेशवे पारितोषिक विजेतें', 'महाराष्ट्राचे पॉल मुनी' वगैरे जाहिराती करून पाहिले. सौंदर्याचा मादक भूसनळा बयादेवी आणि स्फोटक हापटबार चिमादेवी, हे सगळे प्रकार केले. खास बतावणीत स्वतः लेखक रामजोशी सोलापूरकर हेही छापून पाहिले. पण पब्लिक जमेना. तेवढ्यात बयाला दुसऱ्या फडात नाइट वाढवून मिळाली. ती गेली. एकटी चिमा काय कामाची? म्हणून राम-जोशीबाबांनी डॅन्सिंग पार्टी बंद केली. आणि गुढघ्यावर धरून डफ फोडला. (पाहा: 'रामजोशी' सिनेमा.) '' 'सुंदरा मनामधिं भरली'सारखी हिट गाणी करून पब्लिकला पर्वा नाही तर आपणसुद्धा डफ आणि फड मोडून टाकू,'' असे म्हणून त्यांनी एकतारी घेऊन एकपात्री प्रयोग सुरू केले. कीर्तनकार म्हणून त्यांचा लौकिक वाढला. एके दिवशी कीर्तनात सहज त्यांनी, ''आपण आता सार्वजनिक जीवनातून निवृत्त होऊन संन्यास घेणार'' अशी घोषणा केली. लगेच पुण्यात रामजोशी-गौरवनिधी गोळा व्हावयाला सुरुवात झाली. ''जागच्या जागी पंधरावीस हजारांची परडी जमली.'' (पाहा: महाराष्ट्र सारस्वत, पृष्ठ ५६५.) पण रामजोशी-बाबा काशीला गेले नाहीत. पुण्यातच निधन पावले. गौरवसमितीचे

---

२. गरजूंनी वामनपंडित वाचावा.

कार्यवाह थैलीची रक्कम सार्वजनिक कार्याला मदत म्हणून परत द्या, असा तगादा लावून बसल्यामुळे रामजोशीबाबा खचले, असा एक प्रवाद आहे. त्या धक्क्याने त्यांनी इतर कलावंतांना "भाई सावध व्हाऽऽ" असा इशारा देणारे गाणे लिहिले. पैसे गेल्यामुळे त्यांचा ओढा कम्युनिस्ट पार्टीकडे गेला, हे 'भाई सावध व्हा' ह्या गाण्यातून स्पष्ट होते. त्या पंधरावीस हजारांचे गौरवसमितीने काय केले ह्याचा अजून पत्ता नाही. अजून काही पावती-पुस्तके परत यावयाची आहेत असे ऐकतो. त्यांच्यामागे तगादा लावण्या-साठी लिहिलेल्या पत्रांच्या पोस्टेजमध्ये सगळी रक्कम संपली असाही एक खुलासा गेल्या शतकात प्रसिद्ध झाला होता. असो. मुद्‌गलशास्त्र्यांचे ऐकले असते तर देवळात बसून सुखाने खाल्ले असते. तेव्हा 'भाई सावध व्हा'!

**दुसरा बाजीराव**

त्यानंतर दुसऱ्या बाजीरावाची राजवट सुरू झाली. आणि पेशवाईचा




**खचलेले रामजोशी**

शिक्का हाती आल्यावर त्याने पहिली गोष्ट म्हणजे संरक्षणखात्यावरचा सर्व खर्च कमी करून सांस्कृतिक खात्याकडे टाकला. होनाजीला बाजीरावाने तीनशे रुपयांचे मानधन सुरू केले. दुसरे बाजीराव कुठल्याही कलावंताला १०० रुपयांखाली बक्षीस देत नसत. म्हणून सगळे कलावंत त्यांना 'दोन शून्य बाजीराव' म्हणत असत. ह्यांच्या कारकीर्दीत अनेक जण आपापली तुणतुणी वाजवीत शनवारवाड्यावर जमले. एकदा राजाश्रय सुरू झाला की आपापली तुणतुणी वाजवणाऱ्यांना केवढे उत्तेजन मिळते!

## प्रभाकर, होनाजीबाळा वगैरे

सोलापुरी लावणीचा जोर ओसरून पुणेरी लावणीला रंग चढला. प्रभाकर, दादा वीर, बच्याजी दिवटे, महादू सुतार वगैरे मंडळींनी पुण्याच्या रात्री जागत्या ठेवल्या. होनाजीने डेअरीचा बिझिनेस थांबवला. बाळाने शिंप्याच्या दुकानात रिहर्सल सुरू केली. कलेचा उत्कर्ष हा असाच करावा लागतो. डॉक्टरांना ॲक्टर व्हावे लागते. प्राध्यापकांना नाटके लिहावी लागतात. नर्सेसना फार्सेसमध्ये काम करावे लागते, तर सर्वांगीण प्रगती होते. दुसऱ्या बाजीरावाच्या काळात प्रत्येक लावणीकाराची प्रतिभा "सासुसासरा पति यांदेखत अधरामृतमाधुरी। घेतसे काय वदावें परी' अशी धीट झाली होती. म्हणून लावणी फोफावली.

"होनाजीच्या लावण्यांत शृंगार फार आहे" अशी महाराष्ट्र सारस्वतकारांची "छे — बोवा — हे म्हणजे — फारच — झालं — हं" अशा सुरात तक्रार आहे. पण होनाजी तरी काय करणार? पबलिकला काय पाहिजे ते त्याने ओळखले होते. त्या काळी त्याच्याही कानी ही तक्रार आली होती. तो म्हणाला, "लावणीत शृंगार फार आहे म्हनता शास्त्रीबाबा — हे म्हंजे भज्यांत त्येल फार आसतं म्हनन्यापैकी हाय!"

एकूण सगळ्यांचेच फड जमले होते. तमाशा-समीक्षक अधूनमधून शनवारवाड्यापुढे निषेध वगैरे करीत. पण तमासगीर त्यांना विंगेत बसवून चूप करीत.

"श्रीमंतांचें तक्त पुणें खुषवक्त नमुना बाई" असे असताना इंग्रजाने येऊन बेरंग केला. एके दिवशी मंडळी रात्र जागवून जड डोळ्यांनी परतत होती. होनाजीच्या लावणीला पूर्वीचा गहिरेपणा राहिला नाही किंवा बावनखणीत आता पूर्वीच्या गाणाऱ्या राहिल्या नाहीत, वगैरे बोलत शुक्रवार, कसबा, शनिवार वगैरे पेठांतून शनिवारवाड्यापुढल्या नदीकडे

लोक प्रातःस्नानाला निघाले होते. त्यांना वाड्यापुढे झेंडावंदनाचा कार्यक्रम चाललेला दिसला. "हा मध्येच कसा काय बुवा? कालच्या रमण्याच्या वेळी कोणी बोललं नाही" म्हणेपर्यंत शनिवारवाड्यावर कसले तरी निराळेच निशाण चढले. बाळाजीपंत नातूंनी समस्तांस टोपीकरांचा अंमल सुरू झाल्याचे सांगितले. रात्रीचा अंमल संपला नसल्यामुळे काहींनी "असें होय" एवढेच म्हटले. "हें आम्ही पहिल्यापासून सांगत होतों कीं नाहीं सिद्धेश्वरपंत?" असा एक उद्‌गार निघाला. "मग त्वांड ग्वाड करा की गरिबाचं" असेही कोणी म्हणाला. "ब्राह्मणाच्या आधीं तुला दक्षिणा काय रे चोरा?" असाही आरडाओरडा झाला. मंडळी स्नानाला निघून गेली. अलुफिष्टनसाहेबांना घेऊन बाळाजीपंत वाड्यात गेले. साहेबाने बूट काढून प्रवेश केलेला पाहून "साहेब आला तरी आपला धर्म शाबूत राहील" ह्याचे समाधान वाटले. दुसऱ्या बाजीरावांची ब्रह्मावर्ती रवानगी झाल्याचे कळले. प्रवासखर्च साहेबानेच दिल्यामुळे साहेब कनवाळू आहे असेच सगळ्यांचे मत्त झाले.

पब्लिकची टेस्ट पुन्हा बदलली. साहेबाला लावणीत गम्य नव्हते. लावणीवालेही थकत होते. लावण्यांतच वेदान्त वगैरे घालून, म्हटली तर रात्री म्हणावी, हवी तर दिवसा म्हणावी, अशी सोय करीत होते. प्रभाकरासारखा कवी 'गुंतला कर्जाच्या कमळांत'.

"पेशवाईनंतरही बरींच वर्षे हे शाहीर कोणातरी लुंग्यासुंग्याची स्तुति करीत आणि कसल्यातरी सामान्य विषयावर लिहीत कसेबसे जिवंत होते." हे म० सा० पुरवणीकार डॉ० शं० गो० तुळपुळे यांनी म्हटले ते खरे आहे. (पृष्ठ ९६९) एकदा खऱ्या विषयाची गोडी लागली की दुसरे विषय सामान्य असतात हे त्या शाहिरांना कळले नाही. मात्र लुंग्यासुंग्यावर लिहिण्यावाचून त्या बिचाऱ्यांना गत्यंतर नव्हते. कारण ज्याच्यावर स्तोत्रे उधळावी असा महापुरुष महाप्रतापी श्रीमंत दुसरे बाजीराव पेशवे ह्यांच्यानंतर दुसरा झाला तरी कोण? असा आमचाही सवाल आहे. समस्त लावणीकारांच्या वतीने आम्ही हा सवाल टाकतो. ऐकाऽऽ

इष्कबाजिमधि दुसऱ्या बाजीमागुनी लोकोत्तर
दुजा कोण? तें सांगुन द्यावें सवालास उत्तर —
माझ्या रामा र जी जी र जीऽ

## उपसंहार

मुकुंदराजाच्या विवेकसिंधूपासून ते शाहिरांच्या लावण्यांपर्यंतचा हा असा इतिहास आहे. त्यानंतर पेशवाई बुडाली. यादवकालात देवगिरी बुडाली आणि फारसी शिकावे लागले. त्यानंतर मराठशाही आली तेव्हा शिवकालीन मराठी शिकावे लागले. मग पेशवेकालीन मराठी आली. पेशवाई बुडाल्यानंतर इंग्रजाचे राज्य सुरू झाले. आणि लोकांच्या लक्षात आले की आपण आजवर जी काही बोलत वा लिहीत होतो ती मुळी मराठीच नव्हती. तेव्हा इंग्रज सरकारने नेटिव्हांस मराठी शिकविण्यासाठी मेजर टी० कँडी नावाच्या मराठी नि संस्कृत भाषापंडितास नेमले.




**मेजर कँडी नेटिव्हास मराठी शिकवताना**

विनायक कोंडदेव ओक हे त्या काळातले नावाजलेले लेखक आणि ग्रंथकार होते. त्यांनी आपल्या 'ग्रंथकर्तृत्व' ह्या पुस्तकात स्पष्ट लिहिले आहे की "मला मराठी लिहिण्यास मेजर कँडीसाहेबांनीं शिकविलें." त्यानंतर इंग्रजाचे राज्य गेले. यापुढे आपणांस कोणती भाषा शिकावी लागणार आहे ह्याचा आम्हांस तरी अंदाज येत नाही. ज्यास आला असेल त्याने आम्हांस कळवावे, म्हणजे त्या भाषेचा इतिहास लिहावयास घेऊ.

इत्यलम् !



